2011060815460900I



RNI No. MAHBIL/2009/35530


# महाराष्ट्र शासन राजपत्र

# असाधारण भाग चार

वर्ष ३, अंक ११] शनिवार, मे २१, २०११/वैशाख ३१, शके १९३३ [पृष्ठे २४, किंमत : रुपये २०.००

असाधारण क्रमांक ४३


## प्राधिकृत प्रकाशन

महाराष्ट्र विधानमंडळाचे अधिनियम व राज्यपालांनी प्रख्यापित केलेले अध्यादेश व केलेले विनियम.

## अनुक्रमणिका



नगरविकास विभाग

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक २१ मे २०११.

## MAHARASHTRA ORDINANCE No. XII OF 2011.

AN ORDINANCE
FURTHER TO AMEND THE MUMBAI MUNICIPAL CORPORATION ACT, THE BOMBAY PROVINCIAL MUNICIPAL CORPORATIONS ACT, 1949 AND THE CITY OF NAGPUR CORPORATION ACT, 1948.

## सन २०११ चा महाराष्ट्र अध्यादेश क्रमांक १२.

**मुंबई महानगरपालिका अधिनियम, मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम, १९४९ आणि नागपूर शहर महानगरपालिका अधिनियम, १९४८ यांमध्ये आणखी सुधारणा करण्याकरिता अध्यादेश.**

**ज्याअर्थी**, राज्य विधानमंडळाच्या दोन्ही सभागृहांचे अधिवेशन चालू नाही ;

**आणि ज्याअर्थी**, यात यापुढे दिलेल्या प्रयोजनांसाठी, मुंबई महानगरपालिका अधिनियम, मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम, १९४९ आणि नागपूर शहर महानगरपालिका अधिनियम, १९४८ यांमध्ये आणखी सुधारणा करण्यासाठी महाराष्ट्राच्या राज्यपालांनी तात्काळ कार्यवाही करणे जीमुळे आवश्यक व्हावे अशी परिस्थिती अस्तित्वात असल्याबद्दल त्यांची खात्री पटली आहे ; १८८८ चा मुंबई ३. १९४९ चा मुंबई ५९. १९५० चा मध्य प्रांत व वऱ्हाड २.

**त्याअर्थी,** आता, भारताच्या संविधानाच्या अनुच्छेद २१३ च्या खंड (१) द्वारे प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांचा वापर करून, महाराष्ट्राचे राज्यपाल, याद्वारे, पुढील अध्यादेश प्रख्यापित करीत आहेत :—

प्रकरण एक

**प्रारंभिक**

संक्षिप्त नाव व प्रारंभ. **१.** (१) या अध्यादेशास, महाराष्ट्र महानगरपालिका (दुसरी सुधारणा) अध्यादेश, २०११ असे म्हणावे.

(२) तो, तात्काळ अंमलात येईल.

प्रकरण दोन

**मुंबई महानगरपालिका अधिनियम याची सुधारणा**

सन १८८८ चा मुंबई अधिनियम क्रमांक ३ याच्या कलम १६ ची सुधारणा. **२.** मुंबई महानगरपालिका अधिनियम (यात यापुढे, या प्रकरणात, ज्याचा निर्देश " मुंबई महानगरपालिका अधिनियम " असा करण्यात आला आहे) याच्या कलम १६ मधील, पोट-कलम (१) नंतर, पुढील पोट-कलम समाविष्ट करण्यात येईल :— १८८८ चा मुंबई ३.

" (१-१अ) जर, एखादा पालिका-सदस्य किंवा एखादी व्यक्ती, महापौर किंवा, यथास्थिति, उप महापौर हे पद धारण करीत असताना किंवा जेव्हा ती महापौर अथवा उप महापौर हे पद धारण करीत होती त्यावेळी तिचे पदीय कर्तव्य पार पाडतांना तिने केलेल्या गैरवर्तणूकीबद्दल किंवा कोणत्याही अशोभनीय वर्तनाबद्दल दोषी असल्याचे आढळून आल्यास, राज्य शासनास, अशा पालिका-सदस्यास अथवा व्यक्तीस आपले म्हणणे मांडण्याची वाजवी संधी दिल्यानंतर,—

(क) अशा पालिका-सदस्यास त्याच्या पालिका-सदस्य म्हणून असलेल्या उर्वरित कालावधीसाठी पालिका-सदस्य म्हणून राहण्यास निरर्ह ठरविता येईल ; आणि तसेच अशा निरर्हतेच्या आदेशाच्या दिनांकापासून सहा वर्षांच्या कालावधीसाठी पालिका-सदस्य म्हणून निवडून येण्यास निरर्ह ठरविता येईल ;

(ख) अशा व्यक्तीस अशा निरर्हतेच्या आदेशाच्या दिनांकापासून सहा वर्षांच्या कालावधीसाठी पालिका-सदस्य म्हणून निवडून येण्यास निरर्ह ठरविता येईल. ".

सन १८८८ चा मुंबई अधिनियम क्रमांक ३ याच्या कलम १८ ची सुधारणा. **३.** मुंबई महानगरपालिका अधिनियमाच्या कलम १८ मध्ये,—

(क) " लघुवाद न्यायालयाच्या मुख्य न्यायाधीशाकडे " या मजकुराने सुरू होणाऱ्या आणि " निर्णय अंतिम असेल. " या मजकुराने समाप्त होणाऱ्या मजकुराऐवजी पुढील मजकूर दाखल करण्यात येईल :—

" शासनाकडे अर्ज करता येईल आणि महानगरपालिकेने विनंती केल्यास किंवा अन्यथा, आयुक्त, शासनाकडे संदर्भ पाठवील ; आणि शासन त्यास योग्य वाटेल अशी चौकशी केल्यानंतर, असा पालिका-सदस्य हा पालिका-सदस्य असण्यास निरर्ह झाला आहे किंवा नाही याचा निर्णय घेईल आणि त्याचा निर्णय अंतिम असेल :

परंतु, कोणत्याही पालिका-सदस्याला आपले म्हणणे मांडण्याची वाजवी संधी देण्यात आल्याखेरीज त्याला या कलमान्वये शासनाकडून निरर्ह ठरविले जाणार नाही. ";

(ख) समासटीपेतील " लघुवाद न्यायालयाच्या मुख्य न्यायाधीशाने " या मजकुराऐवजी " शासनाने " हा मजकूर दाखल करण्यात येईल.

४. मुंबई महानगरपालिका अधिनियमाच्या कलम ३६ ला त्याचे पोट-कलम (१) असा नवीन क्रमांक देण्यात येईल; आणि,— सन १८८८ चा मुंबई अधिनियम क्रमांक ३ याच्या कलम ३६ ची सुधारणा.

(क) अशाप्रकारे नवीन क्रमांक दिलेल्या पोट-कलम (१) मधील खंड (ट) ऐवजी, पुढील खंड दाखल करण्यात येईल :—

" (ट) पालिका-सदस्यास महानगरपालिकेच्या सभेत उपस्थित राहण्याचा आणि तेथे होणाऱ्या चर्चेत भाग घेण्याचा जो अधिकार असतो तोच अधिकार आयुक्तास अथवा अनुपस्थितीमुळे किंवा आजारामुळे अथवा इतर कोणत्याही वाजवी कारणामुळे आयुक्तास उपस्थित राहणे शक्य नसेल त्या बाबतीत, उप आयुक्ताच्या दर्जापेक्षा कमी दर्जा नसलेल्या अधिकाऱ्यास असेल आणि त्यास, महापौराच्या परवानगीने कोणत्याही वेळी वस्तुस्थितीविषयी निवेदन किंवा स्पष्टीकरण करता येईल. मात्र, त्यास अशा बैठकीत कोणत्याही महत्त्वाच्या प्रस्तावावर मतदान करण्याची किंवा असा प्रस्ताव मांडण्याची मुभा असणार नाही. आयुक्ताची किंवा अशा कोणत्याही अधिकाऱ्याची एखाद्या सभेत वस्तुस्थितीविषयक निवेदन किंवा स्पष्टीकरण करण्याची इच्छा असेल आणि पूर्वोक्तप्रमाणे परवानगी दिली गेली नसेल त्या बाबतीत, आयुक्तास किंवा अशा कोणत्याही अधिकाऱ्यास त्याची प्रत सभागृहाच्या पटलावर मांडण्याचा हक्क असेल. मात्र महानगरपालिका किंवा महापौर फर्मावील तेव्हा, अनुपस्थिती, आजारपण किंवा इतर कोणतेही वाजवी कारण यामुळे महानगरपालिकेच्या सभेस उपस्थित राहण्यास आयुक्तास प्रतिबंध झाला नसेल तर, आयुक्त महानगरपालिकेच्या सभेस उपस्थित राहील ; " ;

(ख) अशा प्रकारे नवीन क्रमांक देण्यात आलेल्या पोट-कलम (१) नंतर, पुढील पोट-कलम जादा दाखल करण्यात येईल :—

" (२) आयुक्ताच्या कोणत्याही प्रस्तावास महानगरपालिकेच्या मंजुरीची किंवा मान्यतेची आवश्यकता असेल त्याबाबतीत, महानगरपालिका, नगरपालिका सचिवाकडे तो प्रस्ताव प्राप्त झाल्यानंतर, महानगरपालिकेच्या लगतच घेण्यात आलेल्या सभेच्या दिनांकापासून नव्वद दिवसांच्या आत असा कोणताही प्रस्ताव विचारात घेईल आणि तो प्रस्ताव निकालात काढील- मग अशा प्रस्तावाशी निगडीत बाब अशा सभेच्या कार्यसूचीवर घेतलेली असो किंवा नसो-तसे न केल्यास, अशा प्रस्तावाला महानगरपालिकेने मंजुरी किंवा मान्यता दिलेली असल्याचे मानण्यात येईल, आणि तशा आशयाचा अहवाल आयुक्ताकडून शासनाला पाठविण्यात येईल ; आणि तो, शासनाच्या निदेशानुसार पुढील कार्यवाही करील :

परंतु, अशी कोणतीही मानीव मंजुरी किंवा मान्यता या अधिनियमाच्या किंवा त्या वेळी अंमलात असलेल्या इतर कोणत्याही कायद्याच्या तरतुदींना अनुरुप असलेल्या प्रस्तावाच्या व्याप्तीपुरतीच मर्यादित असेल. ".

५. मुंबई महानगरपालिका अधिनियमाच्या कलम ३७ मध्ये, पोट-कलम (७) नंतर, पुढील पोट-कलम जादा दाखल करण्यात येईल :— सन १८८८ चा मुंबई अधिनियम क्रमांक ३ याच्या कलम ३७ ची सुधारणा.

" (८) जर महापौर किंवा उप महापौर या अधिनियमाद्वारे किंवा तद्न्वये विनिर्दिष्ट केल्याप्रमाणे महानगरपालिकेच्या लागोपाठ दोन सभा बोलावण्यात कसूर करील तर, त्याला राज्य शासन पदावरून

दूर करू शकेल, आणि अशारीतीने दूर केलेला महापौर किंवा उप महापौर, त्याच्या पदाच्या उर्वरित कालावधीत, महापौर किंवा, यथास्थिति, उप महापौर म्हणून पुन्हा: निवडून येण्यास किंवा पुर्ननियुक्ती केली जाण्यास पात्र असणार नाही :

परंतु, अशा महापौराला किंवा उप महापौराला आपले स्पष्टीकरण सादर करण्याची वाजवी संधी देण्यात आल्याखेरीज त्याला पदावरून दूर करण्यात येणार नाही :

परंतु आणखी असे की, या पोट-कलमान्वये महापौर किंवा उप महापौर याला पदावरून दूर केल्यामुळे त्याच्या पदाच्या उर्वरित कालावधीत तो पालिका-सदस्य म्हणून असण्याचे चालू राहण्यास बाधा येणार नाही. " .

सन १८८८ चा मुंबई अधिनियम क्रमांक ३ याच्या कलम ५०अ ची सुधारणा.

६. मुंबई महानगरपालिका अधिनियमाच्या कलम ५०अ मधील पोट-कलम (२) मध्ये, " आयुक्त " या मजकुराने सुरू होणाऱ्या आणि " त्याचा निर्णय अखेरचा असेल " या मजकुराने समाप्त होणाऱ्या मजकुराऐवजी, पुढील मजकूर दाखल करण्यात येईल :—

" आयुक्त महानगरपालिकेच्या विनंतीवरून किंवा अन्यथा, तो प्रश्न शासनाकडे संदर्भित करील आणि शासन, त्यास आवश्यक वाटेल अशी चौकशी केल्यानंतर जागा रिकामी झाली आहे किंवा नाही याविषयी निर्णय देईल आणि त्याबाबत शासनाचा निर्णय अंतिम असेल :

परंतु, अशा सदस्याला आपले म्हणणे मांडण्याची वाजवी संधी देण्यात आल्याशिवाय, या कलमान्वये शासनाकडून रिकाम्या जागेसंबंधी कोणताही निर्णय घेण्यात येणार नाही. ".

सन १८८८ चा मुंबई अधिनियम क्रमांक ३ यामध्ये कलम ५३अ आणि ५३ब समाविष्ट करणे.

७. मुंबई महानगरपालिका अधिनियमाच्या कलम ५३ नंतर, पुढील कलमे समाविष्ट करण्यात येतील :—

महानगरपालिकेने कोणत्याही समितीच्या अधिकारांचा वापर करणे व तिची कर्तव्ये पार पाडणे.

" ५३ अ. जर, या अधिनियमाखालील कोणतीही समिती किंवा विशेष समिती कोणत्याही वेळी घटित केली नसेल, किंवा ती कोणत्याही कारणामुळे या अधिनियमाखालील आपल्या अधिकारांचा वापर करण्याच्या किंवा आपली कर्तव्ये पार पाडण्याच्या स्थितीत नसेल तर, अशी समिती घटित करण्यात येईपर्यंत किंवा आपल्या अधिकारांचा वापर करण्याच्या किंवा आपली कर्तव्ये पार पाडण्याच्या स्थितीत येईपर्यंत, महानगरपालिका समितीच्या अधिकारांचा वापर करील आणि तिची कर्तव्ये पार पाडील.

समितीचे सभापती किंवा उप सभापती यांना पदावरून दूर करणे.

५३ ब. या अधिनियमान्वये घटित केलेल्या कोणत्याही समितीच्या सभापतीने किंवा उप सभापती असल्यास त्याने, या अधिनियमाद्वारे किंवा तद्न्वये विनिर्दिष्ट केल्याप्रमाणे, समितीच्या लागोपाठच्या दोन सभा बोलावण्यात कसूर केली तर, शासन त्यास पदावरून दूर करू शकेल, आणि अशा प्रकारे पदावरून दूर केलेला सभापती किंवा उप सभापती त्यांच्या उर्वरित पदावधीच्या कालावधीत, त्या समितीचा सभापती किंवा उप सभापती म्हणून पुन्हा निवडून येण्यास किंवा यथास्थिती, त्याची पुर्ननियुक्ती केली जाण्यास पात्र असणार नाही :

परंतु, अशा कोणत्याही सभापतीस किंवा उप सभापतीस आपले स्पष्टीकरण सादर करण्याची वाजवी संधी दिल्याखेरीज, पदावरून दूर करण्यात येणार नाही :

परंतु आणखी असे की, या कलमान्वये सभापती किंवा उप सभापती याला पदावरून दूर केल्यामुळे त्याच्या पदाच्या उर्वरित कालावधीत तो पालिका-सदस्य म्हणून असण्याचे चालू राहण्यास बाधा येणार नाही. ".

८. मुंबई महानगरपालिका अधिनियमाच्या कलम ६०अ मधील, पोट-कलम (३) वगळण्यात येईल. सन १८८८ चा मुंबई अधिनियम क्रमांक ३ याच्या कलम ६०अ ची सुधारणा.

९. मुंबई महानगरपालिका अधिनियमाच्या कलम ६०ड मधील, पोट-कलम (२) वगळण्यात येईल. सन १८८८ चा मुंबई अधिनियम क्रमांक ३ याच्या कलम ६०ड ची सुधारणा.

१०. मुंबई महानगरपालिका अधिनियमाच्या कलम ६४ मधील, पोट-कलम (३) नंतर, पुढील पोट कलम समाविष्ट करण्यात येईल :— सन १८८८ चा मुंबई अधिनियम क्रमांक ३ याच्या कलम ६४ ची सुधारणा.

" (३अ) आयुक्ताच्या कोणत्याही प्रस्तावास, या अधिनियमाच्या तरतुदींन्वये घटित करण्यात आलेल्या कोणत्याही समितीच्या मंजुरीची किंवा मान्यतेची आवश्यकता असेल त्याबाबतीत, समिती, नगरपालिका सचिवाकडे तो प्रस्ताव प्राप्त झाल्यानंतर, समितीच्या लगतच घेण्यात आलेल्या सभेच्या दिनांकापासून पंचेचाळीस दिवसांच्या आत, असा कोणताही प्रस्ताव विचारात घेईल आणि तो प्रस्ताव निकालात काढील- मग अशा प्रस्तावाशी निगडीत बाब अशा सभेच्या कार्यसूचीवर घेतलेली असो किंवा नसो- तसे न केल्यास, अशा प्रस्तावाला समितीने मंजुरी किंवा मान्यता दिलेली असल्याचे मानण्यात येईल, आणि तशा आशयाचा अहवाल आयुक्ताकडून महानगरपालिकेला पाठविण्यात येईल :

परंतु, अशी कोणतीही मानीव मंजुरी किंवा मान्यता, या अधिनियमाच्या किंवा त्यावेळी अंमलात असलेल्या इतर कोणत्याही कायद्याच्या तरतुदींना अनुरुप असलेल्या प्रस्तावाच्या व्याप्तीपुरतीच मर्यादित असेल. ".

११. मुंबई महानगरपालिका अधिनियमाच्या कलम ६९ याच्या खंड (क) मध्ये,— सन १८८८ चा मुंबई अधिनियम क्रमांक ३ याच्या कलम ६९ ची सुधारणा.

(क) " दहा लाख रुपयांहून अधिक परंतु पंधरा लाख रुपयांहून अधिक नाही " या मजकुराऐवजी " एक कोटी रुपयांहून अधिक परंतु एक कोटी पन्नास लाख रुपयांहून अधिक नाही " हा मजकूर दाखल करण्यात येईल;

(ख) " पंधरा लाख रुपयांहून अधिक " या मजकुराऐवजी " एक कोटी पन्नास लाख रुपयांहून अधिक " हा मजकूर दाखल करण्यात येईल;

(ग) विद्यमान पहिल्या परंतुकापूर्वी, पुढील परंतुक समाविष्ट करण्यात येईल :—

" परंतु, ज्यात पाच लाख रुपयांहून अधिक असेल आणि एक कोटी पन्नास लाख रुपयांपेक्षा अधिक नसेल इतक्या खर्चाचा अंतर्भाव असेल अशी, आयुक्ताने केलेली प्रत्येक संविदा, ती करण्यात आल्याच्या दिनांकापासून पंधरा दिवसांच्या आत त्याच्याकडून स्थायी समितीला कळविण्यात येईल : ";

(घ) विद्यमान पहिल्या परंतुकामध्ये,—

(एक) " परंतु " या मजकुराऐवजी " परंतु आणखी असे की " हा मजकूर दाखल करण्यात येईल;

(दोन) " रुपये एक कोटीहून " या मजकुराऐवजी " रुपये पंधरा कोटीहून " हा मजकूर दाखल करण्यात येईल;

(ङ) विद्यमान दुसऱ्या परंतुकामध्ये,—

(एक) " परंतु आणखी असे की " या मजकुराऐवजी " परंतु तसेच, कलम ६४ मध्ये काहीही अंतर्भूत असले तरी, " हा मजकूर दाखल करण्यात येईल;

(दोन) पुढील स्पष्टीकरण जादा दाखल करण्यात येईल :—

" **स्पष्टीकरण.**—या खंडाच्या प्रयोजनार्थ " ते मिळाल्यापासून तीस दिवसांचा " कालावधी, नगरपालिका सचिवाच्या कार्यालयात प्रस्ताव मिळाल्यानंतर, स्थायी समितीच्या लगतच घेण्यात आलेल्या सभेच्या दिनांकापासून मोजण्यात येईल-मग अशा प्रस्तावाशी निगडीत बाब अशा सभेच्या कार्यसूचीवर घेतलेली असो किंवा नसो.".

सन १८८८ चा मुंबई अधिनियम क्रमांक ३ याच्या कलम ७० ची सुधारणा.

**१२.** मुंबई महानगरपालिका अधिनियमाच्या कलम ७० मधील, पोट-कलम (२) मध्ये,—

(क) " स्थायी समितीच्या दोन सदस्यांच्या " या मजकुराऐवजी " स्थायी समितीचे कोणतेही दोन सदस्य, नगरपालिका सचिव आणि आयुक्ताने प्राधिकृत केला असेल असा महानगरपालिका उप आयुक्ताच्या दर्जा पेक्षा कमी दर्जाचा नसलेला कोणताही अधिकारी यामधील कोणत्याही दोन व्यक्तींच्या " हा मजकूर दाखल करण्यात येईल ;

(ख) " स्थायी समितीचे उक्त दोन सदस्य " या मजकुराऐवजी " उक्त दोन व्यक्ती " हा मजकूर दाखल करण्यात येईल ;

(ग) " उक्त सदस्यांच्या " या मजकुराऐवजी " उक्त दोन व्यक्तींच्या " हा मजकूर दाखल करण्यात येईल ;

(घ) परंतुकामध्ये, " स्थायी समितीच्या दोन सदस्यांऐवजी " हा मजकुर वगळण्यात येईल.

सन १८८८ चा मुंबई अधिनियम क्रमांक ३ याच्या कलम ७२ ची सुधारणा.

**१३.** मुंबई महानगरपालिका अधिनियमाच्या कलम ७२ मधील,—

(१) पोट कलम (१) मध्ये,—

(क) " पन्नास हजार रुपयांहून " या मजकुराऐवजी " तीन लाख रुपयांहून " हा मजकूर दाखल करण्यात येईल ;

(ख) पुढील परंतुक जादा दाखल करण्यात येईल :—

" परंतु, तीन लाख रुपयांपेक्षा अधिक नसेल इतक्या रकमेच्या कोणत्याही संविदेच्या निविदेची सूचना, महानगरपालिकेच्या अधिकृत संकेत स्थळावर दर्शविण्यात येईल. " ;

(२) समासटीपेमध्ये, " रु. ५०,००० हून " या मजकुराऐवजी " तीन लाख रुपयांहून " हा मजकूर दाखल करण्यात येईल.

सन १८८८ चा मुंबई अधिनियम क्रमांक ३ यामध्ये कलम १०६अ समाविष्ट करणे.

**१४.** मुंबई महानगरपालिका अधिनियमाच्या कलम १०६ नंतर, पुढील कलम समाविष्ट करण्यात येईल :—

" **१०६अ.** कलम १०६ मध्ये कांहीही अंतर्भूत केलेले असले तरी, राज्य शासनाच्या पूर्व मान्यतेशिवाय, महानगरपालिकेने निर्माण केलेल्या कोणत्याही निधीतून महानगरपालिकेस कोणतेही अंतर्गत कर्ज घेता येणार नाही, तसेच, महानगरपालिकेस ज्या कारणांकरिता तो निधी निर्माण करण्यात आला आहे त्या कारणांखेरीज अन्य कोणत्याही कारणांसाठी अशा निधीचा वापर करता येणार नाही. ". महानगरपालिकेने निर्माण केलेल्या निधीच्या वापरावरील निर्बंध.

**१५.** मुंबई महानगरपालिका अधिनियमाच्या कलम १२२ मधील, पोट-कलम (१) मध्ये, " सरकारी रोख्यांमध्ये " या मजकुरानंतर " किंवा केंद्र सरकार, राज्य शासन, शासनाचे उपक्रम, शासनाच्या वित्तीय संस्था किंवा युनिट ट्रस्ट ऑफ इंडिया, यांच्या कर्जरोख्यांमध्ये किंवा ऋणपत्रांमध्ये " हा मजकूर जादा दाखल करण्यात येईल. सन १८८८ चा मुंबई अधिनियम क्रमांक ३ याच्या कलम १२२ ची सुधारणा.

**१६.** मुंबई महानगरपालिका अधिनियमाच्या कलम १२९ नंतर, पुढील कलम समाविष्ट करण्यात येईल :— सन १८८८ चा मुंबई अधिनियम क्रमांक ३ यामध्ये कलम १२९अ समाविष्ट करणे.

" **१२९अ.** या अधिनियमामध्ये काहीही अंतर्भूत केलेले असले तरी, अर्थसंकल्पीय अंदाज ज्या सरकारी वर्षाशी संबंधित असतील त्या वर्षाच्या प्रारंभापूर्वी महानगरपालिकेने ते अर्थसंकल्पीय अंदाज, कोणत्याही कारणास्तव अंतिमरीत्या स्वीकृत केलेले नसतील तर, महानगरपालिका या अधिनियमाच्या तरतुदींनुसार ते अर्थसंकल्पीय अंदाज रीतसर स्वीकृत करेपर्यंत, कलम १२५ अन्वये आयुक्ताने तयार केलेले खर्च व प्राप्तीचे अंदाज, त्या वर्षाचे अर्थसंकल्पीय अंदाज असल्याचे मानण्यात येईल. ". खर्च व प्राप्ती यांचे अंदाज अर्थसंकल्पीय अंदाज मानणे.

**१७.** मुंबई महानगरपालिका अधिनियमाच्या कलम ५२०ब मधील, पोट-कलम (१) मध्ये, " लोकहिताच्या विरुद्ध " या मजकुरानंतर " किंवा महानगरपालिकेच्या आर्थिक हितसंबंधाविरुद्ध किंवा व्यापक लोकहिताविरुद्ध " हा मजकूर समाविष्ट करण्यात येईल. सन १८८८ चा मुंबई अधिनियम क्रमांक ३ याच्या कलम ५२०ब ची सुधारणा.

## प्रकरण तीन

## मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम, १९४९ यामध्ये सुधारणा

१९४९ चा मुंबई ५९. **१८.** मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम, १९४९ (यात यापुढे, या प्रकरणात, ज्याचा निर्देश " प्रांतिक महानगरपालिका अधिनियम " असा करण्यात आला आहे) याच्या कलम १० मध्ये, पोट-कलम (१) नंतर, पुढील पोट-कलम जादा दाखल करण्यात येईल :— सन १९४९ चा मुंबई अधिनियम क्रमांक ५९ याच्या कलम १० ची सुधारणा.

" (१-१अ) जर, एखादा पालिका-सदस्य किंवा एखादी व्यक्ती, महापौर किंवा, यथास्थिति, उपमहापौर हे पद धारण करीत असताना किंवा जेव्हा ती महापौर अथवा उपमहापौर हे पद धारण करीत होती त्यावेळी तिचे पदीय कर्तव्य पार पाडताना तिने केलेल्या गैरवर्तणूकीबद्दल किंवा कोणत्याही अशोभनीय वर्तनाबद्दल

दोषी असल्याचे आढळून आल्यास, राज्य शासनास, अशा पालिका-सदस्यास अथवा व्यक्तीस आपले म्हणणे मांडण्याची वाजवी संधी दिल्यानंतर,—

(अ) अशा पालिका-सदस्यास त्याच्या पालिका-सदस्य म्हणून असलेल्या उर्वरित कालावधीसाठी पालिका-सदस्य म्हणून राहण्यास निरर्ह ठरवीता येईल ; आणि तसेच अशा निरर्हतेच्या आदेशाच्या दिनांकापासून सहा वर्षांच्या कालावधीसाठी पालिका-सदस्य म्हणून निवडून येण्यास निरर्ह ठरवीता येईल :

(ब) अशा व्यक्तीस अशा निरर्हतेच्या आदेशाच्या दिनांकापासून सहा वर्षांच्या कालावधीसाठी पालिका-सदस्य म्हणून निवडून येण्यास निरर्ह ठरवीता येईल. ".

सन १९४९ चा मुंबई अधिनियम क्रमांक ५९ याच्या कलम १२ ची सुधारणा.

१९. प्रांतिक महानगरपालिका अधिनियमाच्या कलम १२ मध्ये,—

(क) पोट-कलम (१) मध्ये,—

(एक) " आणि महानगरपालिकेने विनंती केल्यास " या मजकुरानंतर " अथवा अन्यथा " हा मजकूर समाविष्ट करण्यात येईल;

(दोन) " न्यायाधीशाकडे " या मजकुराऐवजी " शासनाकडे " हा मजकूर दाखल करण्यात येईल ;

(ख) पोट-कलम (२) मध्ये, " न्यायाधीशाकडे " या मजकुराऐवजी " शासनाकडे " आणि " न्यायाधीश " या मजकुराऐवजी " शासन " हा मजकूर दाखल करण्यात येईल ;

(ग) समासटीपेमध्ये " न्यायाधिशाने " या मजकुराऐवजी " शासनाने " हा मजकूर दाखल करण्यात येईल.

सन १९४९ चा मुंबई अधिनियम क्रमांक ५९ याच्या कलम १३ ची सुधारणा.

२०. प्रांतिक महानगरपालिका अधिनियमाच्या कलम १३ मध्ये,—

(क) पोट-कलम (२) नंतरचे परंतुक वगळण्यात येईल;

(ख) पोट-कलम (४) वगळण्यात येईल.

सन १९४९ चा मुंबई अधिनियम क्रमांक ५९ याच्या कलम १९ ची सुधारणा.

२१. प्रांतिक महानगरपालिका अधिनियमाच्या कलम १९ मध्ये, पोट-कलम (५) नंतर, पुढील पोट-कलम जादा दाखल करण्यात येईल:—

" (६) जर महापौर किंवा उप महापौर या अधिनियमाद्वारे किंवा तदन्वये विनिर्दिष्ट केल्याप्रमाणे महानगरपालिकेच्या लागोपाठ दोन सभा बोलावण्यात कसूर करील तर, त्याला राज्य शासन पदावरून दूर करु शकेल, आणि अशा रितीने दूर केलेला महापौर किंवा उपमहापौर, त्याच्या पदाच्या उर्वरित कालावधीत, महापौर किंवा, यथास्थिती, उपमहापौर, म्हणून पुन्हा निवडून येण्यास किंवा पुर्ननियुक्ती केली जाण्यास पात्र असणार नाही:

परंतु, अशा महापौराला किंवा उपमहापौराला आपले स्पष्टीकरण सादर करण्याची वाजवी संधी देण्यात आल्याखेरीज त्याला पदावरुन दूर करण्यात येणार नाही :

परंतु आणखी असे की, या पोट-कलमान्वये महापौर किंवा उपमहापौर याला पदावरून दूर केल्यामुळे त्याच्या पदाच्या उर्वरित कालावधीत तो पालिका-सदस्य म्हणून असण्याचे चालू राहण्यास बाधा येणार नाही. ".

सन १९४९ चा मुंबई अधिनियम क्रमांक ५९ याच्या कलम २६ ची सुधारणा.

२२. प्रांतिक महानगरपालिका अधिनियमाच्या कलम २६ मधील, पोट-कलम (२) मध्ये,-

(क) " महानगरपालिकेच्या विनंतीवरुन " या मजकुरानंतर " अथवा अन्यथा " हा मजकूर समाविष्ट करण्यात येईल;

(ख) " न्यायाधीशाकडे " या मजकुराऐवजी " शासनाकडे " हा मजकूर दाखल करण्यात येईल.

२३. प्रांतिक महानगरपालिका अधिनियमाच्या कलम ३५ नंतर, पुढील कलमे समाविष्ट करण्यात येतील :— सन १९४९ चा मुंबई अधिनियम क्रमांक ५९ यामध्ये कलमे ३५अ व ३५ब समाविष्ट करणे.

" ३५ अ. जर, या अधिनियमाखालील कोणतीही समिती किंवा विशेष समिती कोणत्याही वेळी घटित केली नसेल, किंवा ती कोणत्याही कारणामुळे या अधिनियमाखालील आपल्या अधिकारांचा वापर करण्याच्या किंवा आपली कर्तव्ये पार पाडण्याच्या स्थितीत नसेल तर, अशी समिती घटित करण्यात येईपर्यंत किंवा आपल्या अधिकारांचा वापर करण्याच्या किंवा आपली कर्तव्ये पार पाडण्याच्या स्थितीत येईपर्यंत, महानगरपालिका समितीच्या अधिकारांचा वापर करील आणि तिची कर्तव्ये पार पाडील. महानगरपालिकेने कोणत्याही समितीच्या अधिकारांचा वापर करणे व तिची कर्तव्ये पार पाडणे.

३५ब. या अधिनियमान्वये घटित केलेल्या कोणत्याही समितीच्या सभापतीने किंवा उप सभापती असल्यास त्याने, या अधिनियमाद्वारे किंवा तदन्वये विनिर्दिष्ट केल्याप्रमाणे समितीच्या लागोपाठच्या दोन सभा बोलावण्यात कसूर केली तर, शासन त्यास पदावरून दूर करु शकेल आणि अशा प्रकारे पदावरून दूर केलेला सभापती किंवा उप सभापती त्यांच्या उर्वरित पदावधीच्या कालावधीत, त्या समितीच्या सभापती किंवा उप सभापती म्हणून पुन्हा निवडून येण्यास किंवा यथास्थिति, त्याची पुनर्नियुक्ती केली जाण्यास पात्र असणार नाही : समितीचे सभापती किंवा उप सभापती यांना पदावरून दूर करणे.

परंतु, अशा कोणत्याही सभापतीस किंवा उप सभापतीस आपले स्पष्टीकरण सादर करण्याची वाजवी संधी दिल्याखेरीज, पदावरून दूर करण्यात येणार नाही :

परंतु आणखी असे की, या कलमान्वये सभापती किंवा उप सभापती याला पदावरून दूर केल्यामुळे त्याच्या पदाच्या उर्वरित कालावधीत तो पालिका-सदस्य म्हणून असण्याचे चालू राहण्यास बाधा येणार नाही.".

२४. प्रांतिक महानगरपालिका अधिनियमाच्या कलम ३९ नंतर पुढील कलम समाविष्ट करण्यात येईल :— सन १९४९ चा मुंबई अधिनियम क्रमांक ५९ यामध्ये कलम ३९अ समाविष्ट करणे.

" ३९अ. (१) राज्य शासनास, महानगरपालिकेत महानगरपालिका अतिरिक्त आयुक्ताची एक किंवा अनेक पदे निर्माण करता येतील आणि अशा प्रकारे योग्य त्या व्यक्तींची नेमणूक करता येईल, जो, आयुक्ताच्या नियंत्रणाच्या अधीनतेने, आयुक्ताच्या सर्व किंवा कोणत्याही अधिकारांचा वापर करील आणि त्याची सर्व किंवा कोणतीही कर्तव्ये व कार्ये पार पाडील. महानगरपालिका अतिरिक्त आयुक्ताची नेमणूक.

(२) महानगरपालिका अतिरिक्त आयुक्त म्हणून अशा प्रकारे नियुक्त केलेली प्रत्येक व्यक्ती, या अधिनियमाच्या तरतुदींनुसार, आयुक्त ज्या दायित्वांच्या, निर्बंधांच्या आणि सेवेच्या अटी व शर्तीच्या अधीन असेल त्याच दायित्वांच्या, निर्बंधांच्या आणि सेवेच्या अटी व शर्तींच्या अधीन राहील. ".

सन १९४९ चा मुंबई अधिनियम क्रमांक ५९ याच्या कलम ४३ ची सुधारणा.

२५. प्रांतिक महानगरपालिका अधिनियमाच्या कलम ४३ मधील, पोट-कलम (२) ऐवजी, पुढील पोट-कलम दाखल करण्यात येईल :—

" (२) आयुक्तास किंवा आयुक्ताच्या वतीने उपस्थित असलेल्या, उप आयुक्ताच्या दर्जापेक्षा कमी दर्जाचा नसलेल्या अधिकाऱ्यास, महानगरपालिकेच्या अथवा तिच्या समितीच्या कोणत्याही सभेमध्ये होणाऱ्या चर्चेत भाग घेण्याचा आणि अन्यथा सहभाग घेण्याचा, तसेच महापौराच्या किंवा समितीच्या पीठासीन अधिकाऱ्याच्या परवानगीने सभेमध्ये आपली मते मांडण्याचा अधिकार असेल, परंतु त्यास कोणत्याही प्रस्तावावर मत देण्याची किंवा तो मांडण्याची मुभा असणार नाही.".

सन १९४९ चा मुंबई अधिनियम क्रमांक ५९ याच्या कलम ५१ ची सुधारणा.

२६. प्रांतिक महानगरपालिका अधिनियमाच्या कलम ५१ मधील,—

(क) पोट-कलम (४) ऐवजी, पुढील पोट-कलम दाखल करण्यात येईल :—

" (४) राज्य शासनाच्या पूर्वमंजुरीशिवाय महानगरपालिकेतील अधिकाऱ्यांची व कर्मचाऱ्यांची कोणतीही नवीन पदे निर्माण करता येणार नाहीत :

परंतु, पदे निर्माण करण्याबाबत महानगरपालिकेकडून सर्वार्थाने परिपूर्ण असा पद निर्मितीचा प्रस्ताव शासनास प्राप्त झाल्यावर त्यावर शासनाकडून घेण्यात आलेला निर्णय असा प्रस्ताव प्राप्त झाल्याच्या दिनांकापासून नव्वद दिवसांच्या आत महानगरपालिकेला कळविण्यात येईल.";

(ख) स्पष्टीकरणाऐवजी पुढील स्पष्टीकरण दाखल करण्यात येईल :—

" **स्पष्टीकरण.**—वेतनमान किंवा वेतन संरचना यांतील कोणतीही सुधारणा किंवा विशेष वेतन किंवा श्रेणी देण्याबाबत किंवा भत्त्यांतील सुधारणा (महागाई भत्ता वगळून) किंवा पदनामातील बदल हे पोट-कलम (४) च्या प्रयोजनांसाठी, नवीन पदाची निर्मिती असल्याचे मानण्यात येईल.".

सन १९४९ चा मुंबई अधिनियम क्रमांक ५९ याच्या कलम ५३ ची सुधारणा.

२७. प्रांतिक महानगरपालिका अधिनियमाच्या कलम ५३ मधील,—

(क) पोट-कलम (१) मध्ये,—

(एक) " महानगरपालिकेच्या ज्या अधिकाऱ्याचे किमान मासिक वेतन भत्ते वगळून चारशे रुपये किंवा त्याहून अधिक आहे " या मजकुराऐवजी " महानगरपालिकेचा जो अधिकारी सहायक आयुक्त या पदाशी समतुल्य असलेल्या किंवा त्यापेक्षा उच्च दर्जाच्या पदावर आहे " हा मजकूर दाखल करण्यात येईल ;

(दोन) परंतुकामध्ये, " भत्ते वगळून चारशे रुपये किंवा त्याहून अधिक मासिक वेतन असलेल्या " या मजकुराऐवजी " महानगरपालिकेचा सहायक आयुक्त या पदाशी समतुल्य असलेल्या किंवा त्यापेक्षा उच्च दर्जाच्या पदावर असलेल्या " हा मजकूर दाखल करण्यात येईल;

(ख) पोट-कलम (३) मधील दुसऱ्या परंतुकामध्ये, " भत्ते वगळून शंभर रुपयांहून अधिक मासिक वेतन असलेल्या " या मजकुराऐवजी " लिपिक या पदाशी समतुल्य असलेल्या किंवा त्यापेक्षा उच्च दर्जाच्या पदाच्या वेतनाएवढे अथवा त्याहून अधिक वेतन असलेल्या " हा मजकूर दाखल करण्यात येईल.

२८. प्रांतिक महानगरपालिका अधिनियमाच्या कलम ५६ मधील, पोट-कलम (१) मध्ये,— सन १९४९ चा मुंबई अधिनियम क्रमांक ५९ याच्या कलम ५६ ची सुधारणा.

(क) परंतुकामध्ये,—

(एक) " भत्ते वगळून ज्याचे मासिक वेतन हजार रुपयांहून अधिक आहे " या मजकुराऐवजी " सहायक आयुक्त या पदाशी समतुल्य असलेल्या किंवा त्यापेक्षा उच्च दर्जाच्या पदावर आहे " हा मजकूर दाखल करण्यात येईल;

(दोन) " स्थायी समितीच्या " या मजकुराऐवजी " महानगरपालिकेच्या " हा मजकूर दाखल करण्यात येईल;

(ख) परंतुकानंतर पुढील स्पष्टीकरण जादा दाखल करण्यात येईल :—

" **स्पष्टीकरण.**—या कलमाच्या व कलम ५३ च्या प्रयोजनार्थ, जर एका पदाचे वेतनश्रेणीतील किमान व कमाल वेतन दुसऱ्या पदासारखेच असेल, तर ती दोन्ही पदे समतुल्य आहेत असे मानले जाईल. जर एका पदाचे किमान वेतन हे दुसऱ्या पदाच्या वेतनश्रेणीतील निदान किमान वेतनाएवढे असेल परंतु कमाल वेतन त्यापेक्षा अधिक असेल तर, पहिले पद दुसऱ्या पदापेक्षा उच्च दर्जाचे मानले जाईल. वेतन संरचनेच्या बाबतीत, जर एका पदाचे वेतन संरचनेतील श्रेणी वेतन हे दुसऱ्याएवढे किंवा त्यापेक्षा अधिक असेल तर, पहिले पद हे दुसऱ्या पदाच्या अनुक्रमे समतुल्य किंवा त्यापेक्षा उच्च दर्जाचे मानले जाईल.".

२९. प्रांतिक महानगरपालिका अधिनियमाच्या कलम ७३ मध्ये,— सन १९४९ चा मुंबई अधिनियम क्रमांक ५९ याच्या कलम ७३ ची सुधारणा.

(क) खंड (क) ऐवजी, पुढील खंड समाविष्ट करण्यात येईल :-

" (क) स्थावर मालमत्ता किवा तिच्यातील कोणताही हितसंबंध किंवा तिच्याशी संबंधित कोणताही हक्क संपादन करण्यासंबधीच्या संविदाखेरीज, ज्यात पन्नास लाख रुपयांहून अधिक परंतु एक कोटीपेक्षा अधिक नसेल इतक्या रकमेचा खर्च अंतर्भूत असेल अशी इतर कोणतीही संविदा महापौराने पूर्व मान्यता दिल्याशिवाय आयुक्ताने करता कामा नये. तथापि, महापौराने मान्यता दिलेल्या सर्व संविदांची एकूण रक्कम वर्षभरात पाच कोटी रुपयांपेक्षा अधिक असता कामा नये. वरील तरतूदींच्या अधिनतेने, पन्नास लाख रुपयांपेक्षा अधिक खर्च अंतर्भूत असेल अशा संविदेस स्थायी समितीची पूर्व मान्यता आवश्यक असेल :

परंतु, अनुसूची ' ड ' च्या प्रकरण दोन मध्ये, नियम ३ मधील खंड (के) मध्ये, काहीही अंतर्भुत असले तरी, जेथे कोणत्याही संविदेसाठी आयुक्ताकडून स्थायी समितीची मान्यता घेतली जाते अशा बाबतीत, स्थायी समिती, त्यासंदर्भात आयुक्ताने केलेल्या प्रस्तावावर, तो प्रस्ताव समितीस मिळाल्यानंतरच्या लगतच घेण्यात आलेल्या सभेच्या दिनांकापासून पंधरा दिवसाच्या आत असा कोणताही प्रस्ताव विचारात घेईल आणि तो प्रस्ताव निकालात काढील- मग अशा प्रस्तावाशी निगडीत बाब अशा सभेच्या कार्यसूचीवर घेण्यात आलेली असो किंवा नसो- तसे न केल्यास, अशा संविदेस स्थायी समितीने मान्यता दिलेली असल्याचे मानण्यात येईल, आणि तशा आशयाचा अहवाल आयुक्ताकडून महानगरपालिकेला पाठविण्यात येईल. " ;

(ख) खंड (ड) मध्ये,—

(एक) " पन्नास हजार " या मजकुराऐवजी " पाच लाख " हा मजकूर दाखल करण्यात येईल ;

(दोन) " दहा लाख " या मजकुराऐवजी " पन्नास लाख " हा मजकूर दाखल करण्यात येईल.

सन १९४९ चा मुंबई अधिनियम क्रमांक ५९ याच्या कलम ७९ ची सुधारणा.

**३०.** प्रांतिक महानगरपालिका अधिनियमाच्या कलम ७९ मधील, खंड (ग) मध्ये, " वस्तीतील रहिवाशांच्या सहकारी संस्थेला " या मजकुरानंतर, पुढील मजकूर दाखल करण्यात येईल :—

" किंवा महानगरपालिकेच्या कोणत्याही विकास योजनांच्या अंमलबजावणीच्या परिणामी बेघर झालेल्या व्यक्तींना किंवा महानगरपालिकेच्या विकास योजनेच्या अंमलबजावणीच्या परिणामी बेघर झालेल्या व्यक्तींनीच केवळ निर्माण केलेल्या गृहनिर्माण सहकारी संस्थेला किंवा महाराष्ट्र शासनाच्या किंवा भारत सरकारच्या कोणत्याही विभागास किंवा उपक्रमास, किंवा सार्वजनिक प्रयोजनांसाठी किंवा वैद्यकीय आणि शैक्षणिक प्रयोजनांसाठीच केवळ मुंबई सार्वजनिक विश्वस्त व्यवस्था अधिनियम, १९५० अन्वये नोंदणी केलेल्या सार्वजनिक न्यासाला ; किंवा संस्था नोंदणी अधिनियम, १८६० अन्वये किंवा महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम, १९६० अन्वये नोंदणी केलेल्या संस्थेस किंवा कंपनी अधिनियम, १९५६ अन्वये नोंदणी केलेल्या कंपनीस किंवा व्यक्तीस सार्वजनिक शौचालये, मुताऱ्या आणि तत्सम सुविधांची तरतूद करण्याच्या प्रयोजनांसाठी किंवा विष्टा, किंवा इतर घाण किंवा कचऱ्यावर प्रक्रिया करण्याकरीता संयत्रे उभारण्यासाठी ".

१९५० चा मुंबई २९.
१८६० चा २१.
१९६१ चा महा. २४.
१९५६ चा १.

सन १९४९ चा मुंबई अधिनियम क्रमांक ५९ याच्या कलम ९२ ची सुधारणा.

**३१.** प्रांतिक महानगरपालिका अधिनियमाच्या कलम ९२ मधील, पोट-कलम (१) मध्ये, " सार्वजनिक कर्जरोख्यांत " या मजकुरानंतर " किंवा केंद्र सरकार, राज्य शासन, शासनाचे उपक्रम, शासनाच्या वित्तीय संस्था किंवा युनिट ट्रस्ट ऑफ इंडिया, यांच्या कर्जरोख्यांमध्ये किंवा ऋणपत्रांमध्ये " हा मजकूर जादा दाखल करण्यात येईल.

**३२.** प्रांतिक महानगरपालिका अधिनियमाच्या कलम १०० नंतर, पुढील कलम समाविष्ट करण्यात येईल :— सन १९४९ चा मुंबई अधिनियम क्रमांक ५९ यामध्ये कलम १००अ समाविष्ट करणे.

" **१००अ.** या अधिनियमात काहीही अंतर्भुत केलेले असले तरी, अर्थसंकल्पीय अंदाज ज्या सरकारी वर्षाशी संबंधीत असतील त्या वर्षाच्या प्रारंभापूर्वी स्थायी समितीने ते अर्थसंकल्पीय अंदाज, कोणत्याही कारणास्तव महानगरपालिकेसमोर सादर केले नसतील आणि त्यामुळे किंवा अन्यथा महानगरपालिकेने ते अर्थसंकल्पीय अंदाज अंतिमरित्या स्वीकृत केलेले नसतील तर, महानगरपालिका या अधिनियमाच्या तरतुदींनुसार ते अर्थसंकल्पीय अंदाज रीतसर स्वीकृत करेपर्यंत, कलम ९५ अन्वये आयुक्ताने तयार केलेले उत्पन्न व खर्च यांचे अंदाज, त्या वर्षाचे अर्थसंकल्पीय अंदाज असल्याचे मानण्यात येईल. ". उत्पन्न व खर्च यांचे अंदाज अर्थसंकल्पीय अंदाज मानणे.

**३३.** प्रांतिक महानगरपालिका अधिनियमाच्या कलम १०९ नंतर, पुढील कलम समाविष्ट करण्यात येईल :— सन १९४९ चा मुंबई अधिनियम क्रमांक ५९ यामध्ये कलम १०९अ समाविष्ट करणे.

" **१०९अ.** कलम १०९ मध्ये काहीही अंतर्भुत केलेले असले तरी, राज्य शासनाच्या पूर्व मान्यतेशिवाय, महानगरपालिकेने निर्माण केलेल्या कोणत्याही निधीतून महानगरपालिकेस कोणतेही अंतर्गत कर्ज घेता येणार नाही, तसेच, महानगरपालिकेस, ज्या कारणांकरिता तो निधी निर्माण करण्यात आला आहे त्या कारणांखेरीज अन्य कोणत्याही कारणांसाठी अशा निधीचा वापर करता येणार नाही. ". महानगरपालिकेने निर्माण केलेल्या निधीच्या वापरावरील निर्बंध.

**३४.** प्रांतिक महानगरपालिका अधिनियमाच्या कलम ४०५ मधील, पोट-कलमे (१), (१-अ) आणि (२) वगळण्यात येतील. सन १९४९ चा मुंबई अधिनियम क्रमांक ५९ याच्या कलम ४०५ ची सुधारणा.

**३५.** प्रांतिक महानगरपालिका अधिनियमाच्या कलम ४५१ मधील, पोट-कलम (१) मध्ये, " अपव्यय होण्याचा संभव आहे " या मजकुरानंतर " किंवा ते महानगरपालिकेच्या आर्थिक हिताच्या अथवा व्यापक लोकहिताच्या विरुद्ध आहे " हा मजकूर समाविष्ट करण्यात येईल. सन १९४९ चा मुंबई अधिनियम क्रमांक ५९ याच्या कलम ४५१ ची सुधारणा.

सन १९४९ चा मुंबई अधिनियम क्रमांक ५९ याच्या अनुसूची 'ड' मधील प्रकरण दोन ची सुधारणा.

३६. प्रांतिक महानगरपालिका अधिनियमाच्या अनुसूची ' ड ' मधील, प्रकरण दोन मधील,—

(क) नियम १ मध्ये , खंड (र) नंतर, पुढील खंड जादा दाखल करण्यात येईल :—

" (स) जेथे, आयुक्ताच्या कोणत्याही प्रस्तावास महानगरपालिकेच्या मंजुरीची किंवा मान्यतेची आवश्यकता असेल त्याबाबतीत महानगरपालिका, नगरपालिका सचिवाकडे तो प्रस्ताव प्राप्त झाल्यानंतर, महानगरपालिकेच्या लगतच घेण्यात आलेल्या सभेच्या दिनांकापासून नव्वद दिवसांच्या आत असा कोणताही प्रस्ताव विचारात घेईल आणि तो प्रस्ताव निकालात काढील- मग अशा प्रस्तावाशी निगडीत बाब अशा सभेच्या कार्यसूचीवर घेतलेली असो किंवा नसो-तसे न केल्यास, अशा प्रस्तावाला महानगरपालिकेने मंजुरी किंवा मान्यता दिलेली असल्याचे मानण्यात येईल, आणि तशा आशयाचा अहवाल आयुक्ताकडून शासनाला पाठविण्यात येईल आणि तो शासनाच्या निदेशानुसार पुढील कार्यवाही करील :

परंतु, अशी कोणतीही मानीव मंजुरी किंवा मान्यता या अधिनियमाच्या किंवा त्यावेळी अंमलात असलेल्या इतर कोणत्याही कायद्यांच्या तरतूदींना अनुरुप असलेल्या प्रस्तावाच्या व्याप्तीपुरतीच मर्यादित असेल. " ;

(ख) नियम ३ मध्ये, खंड (जे) नंतर, पुढील खंड जादा दाखल करण्यात येईल :---

" (के) जेथे आयुक्तांच्या कोणत्याही प्रस्तावास, या अधिनियमाच्या तरतुदींन्वये घटित करण्यात आलेल्या कोणत्याही समितीच्या मंजुरीची किंवा मान्यतेची आवश्यकता असेल त्याबाबतीत, समिती, नगरपालिका सचिवांकडे तो प्रस्ताव प्राप्त झाल्यानंतर, समितीच्या लगतच घेण्यात आलेल्या सभेच्या दिनांकापासून पंचेचाळीस दिवसांच्या आत असा कोणताही प्रस्ताव विचारात घेईल आणि तो प्रस्ताव निकालात काढील - मग अशा प्रस्तावाशी निगडीत बाब अशा सभेच्या कार्यसूचीवर घेतलेली असो किंवा नसो-तसे न केल्यास, अशा प्रस्तावाला समितीने मंजुरी किंवा मान्यता दिलेली असल्याचे मानण्यात येईल, आणि तशा आशयाचा अहवाल आयुक्ताकडून महानगरपालिकेला पाठविण्यात येईल :

परंतु, अशी कोणतीही मानीव मंजुरी किंवा मान्यता या अधिनियमाच्या किंवा त्यावेळी अंमलात असलेल्या इतर कोणत्याही कायद्यांच्या तरतुदींना अनुरुप असलेल्या प्रस्तावाच्या व्याप्तीपुरतीच मर्यादित असेल. ".

सन १९४९ चा मुंबई अधिनियम क्रमांक ५९ याच्या अनुसूची 'ड' मधील प्रकरण पाच ची सुधारणा.

३७. प्रांतिक महानगरपालिका अधिनियमाच्या अनुसूची ' ड ' मधील प्रकरण पाचमध्ये,—

(क) नियम १ याच्या पोट-नियम (२) मध्ये,—

(एक) " स्थायी समितीच्या दोन सदस्यांच्या " या मजकुराऐवजी " स्थायी समितीचे कोणतेही दोन सदस्य, नगरपालिका सचिव आणि आयुक्ताने प्राधिकृत केलेला असेल असा, महानगरपालिका उप आयुक्ताच्या दर्जापेक्षा कमी दर्जा नसलेला कोणताही अधिकारी, यांच्यामधील कोणत्याही दोन व्यक्तींच्या " हा मजकूर दाखल करण्यात येईल;

(दोन) " प्रत्येक संविदेवर किंवा अन्य लेखावर " या मजकुरानंतर " स्थावर मालमत्तेच्या किंवा तीमधील हितसंबधांच्या किंवा तिच्याबाबतीच्या हक्कांच्या संपादनाशी संबंधित असलेल्या संविदेव्यतिरिक्त, " हा मजकूर समाविष्ट करण्यात येईल ;

(तीन) " स्थायी समितीच्या उक्त दोन सदस्यांनी " या मजकुराऐवजी " उक्त दोन व्यक्तींनी " हा मजकूर दाखल करण्यात येईल ;

(चार) " उक्त सदस्यांच्या " या मजकुराऐवजी " उक्त व्यक्तींच्या " हा मजकूर दाखल करण्यात येईल ;

(ख) नियम २ मधील, पोट-नियम (१) मध्ये,—

(एक) " तीन हजार " या मजकुराऐवजी " दोन लाख " हा मजकूर दाखल करण्यात येईल ;

(दोन) पुढील परंतुक जादा दाखल करण्यात येईल :—

" परंतु, दोन लाख रुपयांपेक्षा कमी रकमेच्या कोणत्याही संविदेच्या निविदेची सुचना. महानगरपालिकेच्या अधिकृत संकेतस्थळावर दर्शविण्यात येईल. ".

## प्रकरण चार

## नागपूर शहर महानगरपालिका अधिनियम, १९४८ यामध्ये सुधारणा

१९५० चा मध्य प्रांत व वऱ्हाड २.

**३८.** नागपूर शहर महानगरपालिका अधिनियम, १९४८ (यात यापुढे, या प्रकरणामध्ये, ज्याचा निर्देश " नागपूर महानगरपालिका अधिनियम " असा करण्यात आला आहे) याच्या कलम १५ मधील, पोट-कलम (१) नंतर, पुढील पोट-कलम समाविष्ट करण्यात येईल :— सन १९५० चा मध्य प्रांत व वऱ्हाड अधिनियम क्रमांक २ याच्या कलम १५ ची सुधारणा.

" (१-१अ) जर, एखादा पालिका-सदस्य किंवा एखादी व्यक्ती, महापौर किंवा, यथास्थिति, उप महापौर हे पद धारण करीत असताना किंवा जेव्हा ती महापौर अथवा उप महापौर हे पद धारण करीत होती त्यावेळी त्याचे पदीय कर्तव्य पार पाडतांना तिने केलेल्या गैरवर्तणूकीबद्दल किंवा कोणत्याही अशोभनीय वर्तनाबद्दल दोषी असल्याचे आढळून आल्यास, राज्य शासनास, अशा पालिका-सदस्यास अथवा व्यक्तीस आपले म्हणणे मांडण्याची वाजवी संधी दिल्यानंतर,-

(अ) अशा पालिका-सदस्यास त्याच्या पालिका-सदस्य म्हणून असलेल्या उर्वरित कालावधीसाठी पालिका-सदस्य म्हणून राहण्यास निरर्ह ठरवीता येईल ; आणि तसेच अशा निरर्हतेच्या आदेशाच्या दिनांकापासून सहा वर्षांच्या कालावधीसाठी पालिका-सदस्य म्हणून निवडून येण्यास निरर्ह ठरवीता येईल ;

(ब) अशा व्यक्तीस अशा निरर्हतेच्या आदेशाच्या दिनांकापासून सहा वर्षांच्या कालावधीसाठी पालिका-सदस्य म्हणून निवडून येण्यास निरर्ह ठरवीता येईल. ".

सन १९५० चा मध्य प्रांत व वऱ्हाड अधिनियम क्रमांक २ याच्या कलम १९अ ची सुधारणा.

**३९.** नागपूर महानगरपालिका अधिनियमाच्या कलम १९अ मधील, पोट-कलम (४) वगळण्यात येईल.

सन १९५० चा मध्य प्रांत व वऱ्हाड अधिनियम क्रमांक २ याच्या कलम २० ची सुधारणा.

**४०.** नागपूर महानगरपालिका अधिनियमाच्या कलम २० मधील, पोट-कलम (७) नंतर, पुढील पोट-कलम जादा दाखल करण्यात येईल :—

" (८) जर महापौर किंवा उपमहापौर या अधिनियमाद्वारे किंवा तदन्वये विनिर्दिष्ट केल्याप्रमाणे महानगरपालिकेच्या लागोपाठ दोन बैठकी बोलावण्यात कसूर करील तर, त्याला राज्य शासन पदावरुन दूर करु शकेल, आणि अशारितीने दूर केलेला महापौर किंवा उपमहापौर, त्याच्या पदाच्या उर्वरित कालावधीत, महापौर किंवा, यथास्थिति, उपमहापौर म्हणून पुन्हा निवडून येण्यास किंवा पुर्ननियुक्ती केली जाण्यास पात्र असणार नाही :

परंतु, अशा महापौराला किंवा उपमहापौराला आपले स्पष्टीकरण सादर करण्याची वाजवी संधी देण्यात आल्याखेरीज त्याला पदावरुन दूर करण्यात येणार नाही :

परंतु आणखी असे की, या पोट-कलमान्वये महापौर किंवा उपमहापौर याला पदावरुन दूर केल्यामुळे त्याच्या पदाच्या उर्वरित कालावधीत तो पालिका-सदस्य म्हणून असण्याचे चालू राहण्यास बाधा येणार नाही. ".

सन १९५० चा मध्य प्रांत व वऱ्हाड अधिनियम क्रमांक २ याच्या कलम २५ ची सुधारणा.

**४१.** नागपूर महानगरपालिका अधिनियमाच्या कलम २५ मधील, पोट-कलम (२) मध्ये, " आयुक्ताकडून " या मजकुराऐवजी " स्थायी समितीच्या अध्यक्षाकडून " हा मजकूर दाखल करण्यात येईल.

सन १९५० चा मध्य प्रांत व वऱ्हाड अधिनियम क्रमांक २ यामध्ये कलम ३५अ समाविष्ट करणे.

**४२.** नागपूर महानगरपालिका अधिनियमाच्या कलम ३५ नंतर, पुढील कलम समाविष्ट करण्यात येईल :-

स्थायी समितीची बैठक.

" **३५अ.** आठवड्यातून किमान एकदा आणि आवश्यकता वाटल्यास इतर वेळी स्थायी समितीची बैठक घेण्यात येईल. ".

सन १९५० चा मध्य प्रांत व वऱ्हाड अधिनियम क्रमांक २ यामध्ये कलम ३८-१अ समाविष्ट करणे.

**४३.** नागपूर महानगरपालिका अधिनियमाच्या कलम ३८ नंतर, पुढील कलम समाविष्ट करण्यात येईल :—

मानीव मंजुरी.

" **३८-१अ.** जेथे, आयुक्ताच्या कोणत्याही प्रस्तावास महानगरपालिकेच्या मंजुरीची किंवा मान्यतेची आवश्यकता असेल त्याबाबतीत, महानगरपालिका, नगरपालिका सचिवाकडे तो प्रस्ताव प्राप्त झाल्यानंतर, महानगरपालिकेच्या लगतच घेण्यात आलेल्या बैठकीच्या दिनांकापासून नव्वद दिवसांच्या

आत असा कोणताही प्रस्ताव विचारात घेईल आणि तो प्रस्ताव निकालात काढील - मग अशा प्रस्तावाशी निगडीत बाब अशा बैठकीच्या कार्यसूचीवर घेतलेली असो किंवा नसो - तसे न केल्यास, अशा प्रस्तावाला महानगरपालिकेने मंजुरी किंवा मान्यता दिलेली असल्याचे मानण्यात येईल ; आणि तशा आशयाचा अहवाल आयुक्ताकडून शासनाला पाठविण्यात येईल, आणि तो शासनाच्या निदेशानुसार पुढील कार्यवाही करील.

(२) आयुक्ताच्या कोणत्याही प्रस्तावास, या अधिनियमाच्या तरतुदींअन्वये घटित करण्यात आलेल्या कोणत्याही समितीच्या मंजुरीची किंवा मान्यतेची आवश्यकता असेल त्याबाबतीत, समिती, नगरपालिका सचिवाकडे तो प्रस्ताव प्राप्त झाल्यानंतर, समितीच्या लगतच घेण्यात आलेल्या बैठकीच्या दिनांकापासून पंचेचाळीस दिवसांच्या आत असा कोणताही प्रस्ताव विचारात घेईल आणि तो प्रस्ताव निकालात काढील - मग अशा प्रस्तावाशी निगडीत बाब अशा सभेच्या कार्यसूचीवर घेतलेली असो किंवा नसो - तसे न केल्यास, अशा प्रस्तावाला समितीने मंजुरी किंवा मान्यता दिलेली असल्याचे मानण्यात येईल, आणि तशा आशयाचा अहवाल आयुक्ताकडून महानगरपालिकेला पाठविण्यात येईल :

परंतु, पोट-कलम (१) किंवा (२) अन्वये दिलेली अशी कोणतीही मानीव मंजुरी किंवा मान्यता या अधिनियमाच्या किंवा त्यावेळी अमलात असलेल्या इतर कोणत्याही कायद्याच्या तरतुदींना अनुरुप असलेल्या प्रस्तावाच्या व्याप्तीपुरतीच मर्यादित असेल.".

**४४.** नागपूर महानगरपालिका अधिनियमाच्या कलम ४० नंतर, पुढील पोट-कलम समाविष्ट करण्यात येईल :— सन १९५० चा मध्य प्रांत व वऱ्हाड अधिनियम क्रमांक २ यामध्ये कलम ४०अ समाविष्ट करणे.

" **४०अ.** विशेष समन्वक समितीच्या व विशेष समितींच्या बैठकींची संख्या, कार्यवृत्ते ठेवणे, अहवाल सादर करणे व अशा समित्यांपुढील इतर बाबी, विहित करण्यात येतील अशा रीतीने विनियमित करण्यात येतील. ". विशेष समन्वक समितीच्या व विशेष समितींच्या बैठकी आणि कार्यवृत्त ठेवणे.

**४५.** नागपूर महानगरपालिका अधिनियमाच्या कलम ४३ नंतर, पुढील कलमे समाविष्ट करण्यात येतील :--- सन १९५० चा मध्य प्रांत व वऱ्हाड अधिनियम क्रमांक २ यामध्ये कलम ४३अ व ४३ब समाविष्ट करणे.

" **४३अ.** जर, या अधिनियमाखालील कोणतीही समिती किंवा विशेष समिती कोणत्याही वेळी घटित केली नसेल, किंवा ती कोणत्याही कारणामुळे या अधिनियमाखालील आपल्या अधिकारांचा वापर करण्याच्या किंवा आपली कर्तव्ये पार पाडण्याच्या स्थितीत नसेल तर, अशी समिती घटित करण्यात येईपर्यंत किंवा आपल्या अधिकारांचा वापर करण्याच्या किंवा आपली कर्तव्ये पार पाडण्याच्या स्थितीत येईपर्यंत, महानगरपालिका समितीच्या अधिकारांचा वापर करील आणि तिची कर्तव्ये पार पाडील. महानगरपालिकेने कोणत्याही समितीच्या अधिकारांचा वापर करणे व तिची कर्तव्ये पार पाडणे.

**४३ब.** या अधिनियमान्वये घटित केलेल्या कोणत्याही समितीच्या अध्यक्षाने किंवा उपाध्यक्ष असल्यास त्याने, या अधिनियमाद्वारे किंवा तदन्वये विनिर्दिष्ट केल्याप्रमाणे, समितीच्या लागोपाठच्या दोन बैठका बोलवण्यात कसूर केली तर, शासन त्यास पदावरुन दूर करु शकेल आणि अशा प्रकारे पदावरुन दूर केलेला अध्यक्ष किंवा उपाध्यक्ष त्यांच्या उर्वरित पदावधीच्या कालावधीत, अध्यक्ष किंवा उपाध्यक्ष म्हणून पुन्हा निवडून येण्यास किंवा, यथास्थिति, त्याची पुनर्नियुक्ती केली जाण्यास पात्र असणार नाही : समितीचे अध्यक्ष किंवा उपाध्यक्ष यांना पदावरून दूर करणे.

परंतु, अशा कोणत्याही अध्यक्षास किंवा उपाध्यक्षास आपले स्पष्टीकरण सादर करण्याची वाजवी संधी दिल्याखेरीज, त्याच्या पदावरुन दूर करण्यात येणार नाही :

परंतु आणखी असे की, या कलमान्वये अध्यक्ष किंवा उपाध्यक्ष याला पदावरुन दूर केल्यामुळे, त्याच्या पदाच्या उर्वरित कालावधीत तो पालिका-सदस्य म्हणून असण्याचे चालू राहण्यास बाधा येणार नाही.".

सन १९५० चा मध्य प्रांत व वऱ्हाड अधिनियम क्रमांक २ यामध्ये कलम ४८अ समाविष्ट करणे.

**४६.** नागपूर महानगरपालिका अधिनियमाच्या कलम ४८ नंतर, पुढील कलम समाविष्ट करण्यात येईल :—

महानगरपालिका अतिरिक्त आयुक्ताची नियुक्ती.

**४८अ.** (१) राज्य शासनास, महानगरपालिकेत महानगरपालिका अतिरिक्त आयुक्ताची एक किंवा अनेक पदे निर्माण करता येतील आणि अशा पदांवर योग्य त्या व्यक्तींची नेमणूक करता येईल, जो, आयुक्ताच्या नियंत्रणाच्या अधीनतेने, आयुक्ताच्या सर्व किंवा कोणत्याही अधिकारांचा वापर करील आणि त्याची सर्व किंवा कोणतीही कर्तव्ये व कार्ये पार पाडील.

(२) महानगरपालिका अतिरिक्त आयुक्त म्हणून अशा प्रकारे नियुक्त केलेली प्रत्येक व्यक्ती, या अधिनियमाच्या तरतुदींनुसार, आयुक्त ज्या दायित्वांच्या, निर्बंधांच्या आणि सेवेच्या अटी व शर्तींच्या अधीन असेल त्याच दायित्वांच्या, निर्बंधांच्या आणि सेवेच्या अटी व शर्तींच्या अधीन राहील. ".

सन १९५० चा मध्य प्रांत व वऱ्हाड अधिनियम क्रमांक २ याच्या कलम ४९ ची सुधारणा.

**४७.** नागपूर महानगरपालिका अधिनियमाच्या कलम ४९ मधील, पोट-कलम (१) मध्ये, " महानगरपालिका उप आयुक्त " या मजकुरानंतर " आणि महानगरपालिका सहायक आयुक्त " हा मजकूर दाखल करण्यात येईल.

सन १९५० चा मध्य प्रांत व वऱ्हाड अधिनियम क्रमांक २ याच्या कलम ५० ची सुधारणा.

**४८.** नागपूर महानगरपालिका अधिनियमाच्या कलम ५० मधील,—

(१) पोट-कलम (१) मध्ये,—

(क) " दरमहा, एक हजार रुपयांपेक्षा अधिक वेतन असलेले " हा मजकूर वगळण्यात येईल;

(ख) विद्यमान परंतुकाच्या अगोदर, पुढील परंतुक समाविष्ट करण्यात येईल :—

" परंतु, पदे निर्माण करण्याबाबत महापालिकेकडून सर्वार्थाने परिपूर्ण असा पदनिर्मितीचा प्रस्ताव शासनास प्राप्त झाल्यावर शासनाकडून त्यावर घेण्यात आलेला निर्णय असा प्रस्ताव प्राप्त झाल्याच्या दिनांकापासून नव्वद दिवसांच्या आत महानगरपालिकेला कळविण्यात येईल : ";

(ग) विद्यमान परंतुकामध्ये ,—

(एक) " परंतु " या मजकुराऐवजी " परंतु आणखी असे की " हा मजकूर दाखल करण्यात येईल ;

(दोन) खंड (१) मध्ये, " ज्यांचे किमान मासिक वेतन सहाशे रुपयांपेक्षा कमी नसेल अशा " या मजकुराऐवजी " ज्या पदांचा दर्जा, सहायक आयुक्ताच्या पदास समकक्ष किंवा त्या पदापेक्षा उच्च असेल अशा पदांवरील " हा मजकूर दाखल करण्यात येईल ;

(तीन) खंड (२) वगळण्यात येईल ;

(चार) खंड (४) नंतर, पुढील स्पष्टीकरण समाविष्ट करण्यात येईल :—

" **स्पष्टीकरण.**--- वेतनमान किंवा वेतन संरचना यामधील कोणतीही सुधारणा किंवा विशेष वेतन किंवा श्रेणी देण्याबाबत किंवा भत्यांतील (महागाई भत्ता वगळून) किंवा पदनामातील बदल हे पोट-कलम (१) च्या प्रयोजनांसाठी, नवीन पदाची निर्मिती असल्याचे मानण्यात येईल.";

(२) पोट-कलम (३) नंतर, पुढील स्पष्टीकरण समाविष्ट करण्यात येईल :—

" **स्पष्टीकरण.**— या कलमाच्या प्रयोजनार्थ, जर एका पदाचे वेतनश्रेणीतील किमान व कमाल वेतन दुसऱ्या पदासारखेच असेल, तर ती दोन्हीं पदे समतुल्य आहेत असे मानले जाईल. जर एका पदाचे किमान वेतन हे दुसऱ्या पदाच्या वेतनश्रेणीतील निदान किमान वेतनाएवढे असेल परंतु कमाल वेतन त्यापेक्षा अधिक असेल तर, पहिले पद दुसऱ्या पदापेक्षा उच्च दर्जाचे मानले जाईल. वेतन संरचनेच्या बाबतीत, जर एका पदाचे वेतन संरचनेतील श्रेणी वेतन हे दुसऱ्याएवढे किंवा त्यापेक्षा अधिक असेल तर, पहिले पद हे दुसऱ्या पदाच्या अनुक्रमे समतुल्य किंवा त्यापेक्षा उच्च दर्जाचे मानले जाईल.".

**४९.** नागपूर महानगरपालिका अधिनियमाच्या कलम ५१ नंतर, पुढील कलम समाविष्ट करण्यात येईल :— सन १९५० चा मध्य प्रांत व वऱ्हाड अधिनियम क्रमांक २ यामध्ये कलम ५१अ समाविष्ट करणे.

" **५१अ.** (१) आयुक्त किंवा याबाबतीत त्याने पर्दानिर्देशित केलेला अन्य कोणताही अधिकारी, महानगरपालिका मुख्य लेखापरीक्षक, संबंधित विभागाचा प्रमुख आणि आयुक्ताने नामनिर्देशित केलेला एक अधिकारी यांचा समावेश असलेली एक कर्मचारी निवड समिती असेल. कर्मचारी निवड समिती घटित करणे.

(२) आधीच नगरपालिका सेवेत असलेल्या व अर्हता, वय आणि अनुभव यासंबंधातील पात्रताविषयक निकषांची पुर्तता करणाऱ्या व्यक्तींमधून नेमणूक करण्याचे योजले नसेल तर किंवा नेमणुक तात्पुरत्या स्वरुपाची असून सहा महिन्यांपेक्षा अधिक काळासाठी नसेल तर, कर्मचारी निवड समिती, नियमांद्वारे विहित केलेल्या रीतीने, कलम ५३ च्या पोट-कलम (१) मध्ये निर्दिष्ट केलेल्या नेमणुकांव्यतिरिक्त व महानगरपालिका, राज्य शासनाच्या पूर्वमान्यतेने, आदेशाद्वारे याबाबत विनिर्दिष्ट करील अशा नेमणुकांव्यतिरिक्त, महानगरपालिका सेवेतील सर्व नेमणुकांसाठी उमेदवारांची निवड करील.

(३) अशा रीतीने निवड झालेल्या उमेदवारांच्या नेमणूका, नगरपालिका सेवेमध्ये नेमणुका करण्यास सक्षम असलेला प्रत्येक प्राधिकारी, कर्मचारी निवड समितीने दिलेल्या निदेशांनुसार करील. ".

**५०.** नागपूर महानगरपालिका अधिनियमाच्या कलम ५३ च्या, पोट-कलम (२) मधील, विद्यमान परंतुक वगळण्यात येईल. सन १९५० चा मध्य प्रांत व वऱ्हाड अधिनियम क्रमांक २ याच्या कलम ५३ ची सुधारणा.

सन १९५० चा मध्य प्रांत व वऱ्हाड अधिनियम क्रमांक २ याच्या कलम ६३ ची सुधारणा.

**५१.** नागपूर महानगरपालिका अधिनियमाच्या कलम ६३ मधील,—

(क) खंड (क) मध्ये,—

(एक) " दहा लाख " या मजकुराऐवजी " पन्नास लाख " हा मजकूर दाखल करण्यात येईल ;

(दोन) " पंधरा लाख " हा मजकुर ज्या दोन ठिकाणी आला आहे तेथे त्याऐवजी " एक कोटी " हा मजकूर दाखल करण्यात येईल ;

(तीन) " एक कोटी " या मजकुराऐवजी "पाच कोटी " हा मजकूर दाखल करण्यात येईल;

(चार) परंतुकामध्ये, " स्थायी समिती " या मजकुराऐवजी " कलम ३८-१ अ मधील पोट-कलम(२) मध्ये काहीही अंतर्भूत असले तरी स्थायी समिती " हा मजकूर दाखल करण्यात येईल;

(पाच) परंतुकानंतर पुढील स्पष्टीकरण जादा दाखल करण्यात येईल :—

" **स्पष्टीकरण** .— या खंडाच्या प्रयोजनार्थ, " प्रस्ताव मिळाल्याचा दिनांक " या संज्ञेचा अर्थ, नगरपालिका सचिवाच्या कार्यालयात प्रस्ताव मिळाल्यानंतर, स्थायी समितीच्या लगतच घेण्यात आलेल्या बैठकीचा दिनांक - मग अशा प्रस्तावाशी निगडीत बाब अशा बैठकीच्या कार्यसूचीवर घेतलेली असो किंवा नसो-असा आहे." ;

(ख) खंड (ड) मध्ये, " दोन लाख रुपयांपेक्षा अधिक परंतु दहा लाख रुपये " या मजकुराऐवजी " पाच लाख रुपयांपेक्षा अधिक परंतु जास्तीत जास्त पन्नास लाख रुपये " हा मजकूर दाखल करण्यात येईल.

सन १९५० चा मध्य प्रांत व वऱ्हाड अधिनियम क्रमांक २ याच्या कलम ६४ ची सुधारणा.

**५२.** नागपूर महानगरपालिका अधिनियमाच्या कलम ६४ मधील,—

(१) पोट-कलम (१) मध्ये,—

(क) " पन्नास हजार " या मजकुराऐवजी " दोन लाख " हा मजकूर दाखल करण्यात येईल ;

(ख) पुढील परंतुक जादा दाखल करण्यात येईल :—

" परंतु, दोन लाख रुपयांपेक्षा अधिक नसेल इतक्या रकमेच्या कोणत्याही संविदेच्या निविदेची सूचना, महानगरपालिकेच्या अधिकृत संकेत स्थळावर दर्शविण्यात येईल." ;

(२) समासटीपेमध्ये, " पन्नास हजार " या मजकुराऐवजी " दोन लाख " हा मजकूर दाखल करण्यात येईल.

सन १९५० चा मध्यप्रांत व वऱ्हाड अधिनियम क्रमांक २ याच्या कलम ८३ ची सुधारणा.

**५३.** नागपूर महानगरपालिका अधिनियमाच्या कलम ८३ मध्ये, " राज्य शासन, याबाबतीत विहित करील अशा सार्वजनिक प्रतिभूतीमध्ये " या मजकुरानंतर " किंवा केंद्र सरकार, राज्य शासन, शासनाचे उपक्रम, शासनाच्या वित्तीय संस्था किंवा युनिट ट्रस्ट ऑफ इंडिया यांच्या कर्जरोख्यांमध्ये किंवा ऋणपत्रांमध्ये " हा मजकूर जादा दाखल करण्यात येईल.

**५४.** नागपूर महानगरपालिका अधिनियमाच्या कलम ९० नंतर, पुढील कलम समाविष्ट करण्यात येईल :— सन १९५० चा मध्य प्रांत व वऱ्हाड अधिनियम क्रमांक २ यामध्ये कलम ९०अ समाविष्ट करणे.

" **९०अ.** कलम ९० मध्ये काहीही अंतर्भूत केलेले असले तरी, राज्य शासनाच्या पूर्व मान्यतेशिवाय, महानगरपालिकेने निर्माण केलेल्या कोणत्याही निधींमधून महानगरपालिकेस कोणतेही अंतर्गत कर्ज घेता येणार नाही, तसेच, महानगरपालिकेस, ज्या कारणांकरिता तो निधी निर्माण करण्यात आला आहे त्या कारणांखेरीज अन्य कोणत्याही कारणांसाठी अशा निधीचा वापर करता येणार नाही.". महानगरपालिकेने निर्माण केलेल्या निधीच्या वापरावरील निर्बंध.

**५५.** नागपूर महानगरपालिका अधिनियमाच्या कलम ४०७ मधील, पोट-कलम (१) मध्ये, "महानगरपालिका निधीचा अपव्यय होण्याचा किंवा त्याचे नुकसान होण्याचा संभव आहे" या मजकुरानंतर " किंवा महानगरपालिकेच्या आर्थिक हिताच्या विरोधात जाण्याचा किंवा व्यापक लोकहिताच्या विरोधात जाण्याचा संभव आहे" हा मजकूर समाविष्ट करण्यात येईल. सन १९५० चा मध्य प्रांत व वऱ्हाड अधिनियम क्रमांक २ याच्या कलम ४०७ ची सुधारणा.

## निवेदन.

बृहन्मुंबई व नागपूर या महानगरपालिकांचे कामकाज अनुक्रमे मुंबई महानगरपालिका अधिनियम (१८८८ चा मुंबई ३) आणि नागपूर शहर महानगरपालिका अधिनियम, १९४८ (१९५० चा मध्यप्रांत व वऱ्हाड २) याद्वारे नियंत्रित केले जाते ; आणि उर्वरित महानगरपालिकांचे कामकाज मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम, १९४९ (१९४९ चा मुंबई ५९) याद्वारे नियंत्रित केले जाते. महानगरपालिकांच्या कामकाजात अधिक उच्च कार्यक्षमता, पारदर्शकता आणि उत्तरदायित्व आणण्यासाठी आणि तसेच, विभिन्न महानगरपालिका अधिनियमांच्या तरतुदींमध्ये शक्य तेथवर एकरुपता आणण्यासाठी, महाराष्ट्र शासनास, उक्त महानगरपालिका अधिनियमांमध्ये योग्य त्या सुधारणा करणे आवश्यक वाटते.

२. उक्त सर्व महानगरपालिका अधिनियमांमध्ये करण्याचे योजलेल्या काही महत्त्वाच्या तरतुदी स्थूल स्वरुपात पुढील प्रमाणे आहेत :—

(एक) महापौर किंवा उप महापौर किंवा कोणत्याही समितीचा सभापती किंवा उपसभापती अधिनियमाद्वारे किंवा त्याअन्वये विनिर्दिष्ट केल्याप्रमाणे महानगरपालिकेच्या किंवा संबंधित समितीच्या लागोपाठ दोन सभा बोलावण्यात कसूर करील तर, त्यास पदावरुन दूर करण्यासंबंधीची तरतूद करणे ;

(दोन) निर्णय करण्यासाठी होणाऱ्या विलंबास प्रतिबंध करण्याकरिता, आयुक्ताकडून सादर करण्यात येणारा कोणताही प्रस्ताव निकालात काढण्यासाठी महानगरपालिका तसेच, तिची कोणतीही समिती यांच्याकरिता कालमर्यादा विहित करणे ;

(तीन) महानगरपालिकेचा कारभार सुरळीत चालू राहील याची खात्री करण्यासाठी, जी कोणतीही समिती कोणत्याही वेळी घटित केलेली नसेल किंवा ती आपल्या अधिकारांचा वापर करण्याच्या किंवा आपली कर्तव्ये पार पाडण्याच्या स्थितीत नसेल तेव्हा अशी समिती घटित करण्यात येईपर्यंत किंवा ती आपले अधिकार वापरण्याच्या किंवा कर्तव्ये पार पाडण्याच्या स्थितीत येईपर्यंत, अशा कोणत्याही समितीचे अधिकार वापरण्यासाठी व तिची कर्तव्ये पार पाडण्यासाठी महानगरपालिकेला अधिकार प्रदान करणे ;

(चार) महापौर व आयुक्त यांच्या वित्तीय अधिकारांत वाढ करणे ;

(पाच) बांधकामे व खरेदी यासाठी वर्तमानपत्रांमध्ये निविदेची सूचना प्रसिद्ध करण्याकरिता वित्तीय मर्यादा वाढविणे ;

(सहा) अधिक विवेकपूर्ण आर्थिक निर्णय व्हावेत यासाठी महानगरपालिकेने अंतर्गत कर्ज उभारण्यापूर्वी शासनाची पूर्व परवानगी घेणे तिला अनिवार्य करणे ;

(सात) केंद्र सरकार, राज्य शासन, शासनाचे उपक्रम, शासनाच्या वित्तीय संस्था किंवा युनिट ट्रस्ट ऑफ इंडिया यांच्या कर्जरोख्यांमध्ये व ऋणपत्रांमध्ये महानगरपालिकांचा शिल्लक पैसा गुंतवण्यासाठी महानगरपालिकांना अधिकार प्रदान करणे ;

(आठ) महानगरपालिकांचे पदाधिकारी आणि सदस्य यांना त्यांच्या कर्तव्यकसूरीबाबत उत्तरदायी ठरविण्यासंबंधी तरतुदी अधिक प्रभावी करण्यासाठी ,—

(क) कोणत्याही पालिका सदस्याच्या निरर्हते संबंधीची बाब आयुक्ताने महानगरपालिकेच्या निदेशावरून किंवा अन्यथा शासनाकडे निर्णयार्थ पाठविण्यासंबंधीची तरतूद करणे;

(ख) महानगरपालिकेने संमत केलेला कोणताही ठराव त्या महानगरपालिकेच्या वित्तीय हिताविरुध्द किंवा व्यापक लोकहिताविरुध्द जाण्याचा संभव असेल तर, तिच्या अशा कोणत्याही ठरावाला आवश्यकता असल्यास निलंबित करण्यासाठी किंवा विखंडीत करण्यासाठी राज्य शासनाला अधिकार प्रदान करणे;

(ग) एखादी व्यक्ती महापौर किंवा उप महापौर पद धारण करीत असतांना किंवा ते पद धारण करीत होती त्यावेळी आपली पदीय कर्तव्ये पार पाडतांना गैरवर्तणुकीबद्दल किंवा कोणत्याही अशोभनीय वर्तनाबद्दल दोषी असल्याचे आढळून आल्यास अशा कोणत्याही पालिका-सदस्याच्या किंवा व्यक्तीच्या निरर्हतेसंबंधीची तरतूद करणे.

३. मुंबई महानगरपालिका अधिनियम आणि मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम, १९४९ यांमध्ये पुढीलप्रमाणे तरतुदी करण्याचे योजले आहे :—

(एक) प्रत्येक संविदा किंवा इतर संलेख निष्पादित करण्यासंबंधीची सध्याची अधिनियमातील तरतूद सुलभ करणे ;

(दोन) महानगरपालिकेत करण्यात येणारे निर्णय पूर्ण माहितीवर आधारीत राहतील हे सुनिश्चित करण्यासाठी, महापौराच्या परवानगीने सभेत आपले मत व्यक्त करण्यासाठी आयुक्ताला किंवा आयुक्ताच्या वतीने सभेत उपस्थित राहणाऱ्या इतर कोणत्याही अधिकाऱ्याला अधिकार प्रदान करणे ;

(तीन) महानगरपालिकेचा कारभार सुरळीत चालू राहील हे सुनिश्चित करण्यासाठी जर महानगरपालिका कोणत्याही कारणास्तव एखाद्या सरकारी वर्षाच्या प्रारंभापूर्वी अर्थसंकल्पीय अंदाज स्वीकृत करण्याच्या स्थितीत नसेल तर, अर्थसंकल्प मंजूर होईपर्यंत आयुक्ताने तयार केलेले असतील अशा खर्च व प्राप्तीच्या अंदाजाला त्या वर्षाचे अर्थसंकल्पीय अंदाज म्हणून समजण्यासंबंधीची तरतूद करणे.

४. मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम, १९४९ आणि नागपूर शहर महानगरपालिका अधिनियम, १९४८ यांमध्ये पुढील प्रमाणे तरतुदी करण्याचे योजले आहे :—

(एक) आस्थापनेवरील खर्च नियंत्रणात ठेवला जाईल याची खात्री करण्यासाठी, महानगरपालिकेच्या आस्थापनेवर कोणतीही पदे निर्माण करण्यापुर्वी शासनाची पूर्व मान्यता अनिवार्य करण्यासंबंधीची तरतूद करणे ;

(दोन) महानगरपालिका प्रशासन बळकट करण्यासाठी, शासनाने महानगरपालिका अतिरिक्त आयुक्ताची एक किंवा अधिक पदे निर्माण करण्यासाठी व त्या पदांवर नियुक्ती करण्यासाठी तरतूद करणे.

५. विवक्षित प्रकरणांत महानगरपालिकेचे भूखंड राज्य शासनाच्या पूर्व मान्यतेने सवलतीच्या दराने भाडेपट्ट्याने देण्यासाठी मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम, १९४९ यामध्ये तरतूद करण्याचे योजले आहे.

६. कर्मचारी निवड प्रक्रियेमध्ये सुसूत्रता आणण्यासाठी कर्मचारी निवड समिती घटित करण्याकरिता नागपूर शहर महानगरपालिका अधिनियम, १९४८ यामध्ये तरतूद करण्याचे योजले आहे.

७. प्रस्तावित दुरुस्त्या ह्या सुधारणाभिमुख असून त्या नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेची कार्यक्षमता व उत्तरदायित्व यात वाढ करणाऱ्या आहेत, म्हणून, कोणताही विलंब न करता या सुधारणांची अंमलबजावणी करणे शासनास इष्ट वाटते.

८. राज्य विधानमंडळाच्या दोन्ही सभागृहांचे अधिवेशन चालू नाही आणि उपरोक्त प्रयोजनांकरिता मुंबई महानगरपालिका अधिनियम, मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम, १९४९ आणि नागपूर शहर महानगरपालिका अधिनियम, १९४८ यांमध्ये आणखी सुधारणा करण्यासाठी महाराष्ट्राच्या राज्यपालांनी तात्काळ कार्यवाही करणे जीमुळे आवश्यक व्हावे अशी परिस्थिती अस्तित्वात असल्याबद्दल त्यांची खात्री पटली आहे, म्हणून, हा अध्यादेश प्रख्यापित करण्यात येत आहे.

मुंबई,
दिनांक २१ मे २०११.

**के. शंकरनारायणन्,**
महाराष्ट्राचे राज्यपाल.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**मनुकुमार श्रीवास्तव,**
शासनाचे प्रधान सचिव.

ON BEHALF OF GOVERNMENT PRINTING, STATIONERY AND PUBLICATION, PRINTED AND PUBLISHED BY SHRI PARSHURAM JAGANNATH GOSAVI, PRINTED AT GOVERNMENT CENTRAL PRESS, 21-A, NETAJI SUBHASH ROAD, CHARNI ROAD, MUMBAI 400 004 AND PUBLISHED AT DIRECTORATE OF GOVERNMENT PRINTING, STATIONERY AND PUBLICATION, 21-A, NETAJI SUBHASH ROAD, CHARNI ROAD, MUMBAI 400 004, EDITOR : SHRI PARSHURAM JAGANNATH GOSAVI.



RNI No. MAHENG/2009/35528

# महाराष्ट्र शासन राजपत्र
# असाधारण भाग आठ

वर्ष ३, अंक १७] शनिवार, मे २१, २०११/वैशाख ३१, शके १९३३ [पृष्ठे २२, किंमत : रुपये १४.००

असाधारण क्रमांक ६२

## प्राधिकृत प्रकाशन

**महाराष्ट्र विधानमंडळाचे अधिनियम व राज्यपालांनी प्रख्यापित केलेले अध्यादेश व केलेले विनियम आणि विधी व न्याय विभागाकडून आलेली विधेयके (इंग्रजी अनुवाद).**

In pursuance of clause (3) of article 348 of the Constitution of India, the following translation in English of the Maharashtra Municipal Corporations (Second Amendment) Ordinance, 2011 (Mah. Ord. XII of 2011), is hereby published under the authority of the Governor.

By order and in the name of the Governor of Maharashtra,

H. B. PATEL,
Secretary to Government,
Law and Judiciary Department.

[ Translation in English of the Maharashtra Municipal Corporations (Second Amendment) Ordinance, 2011 (Mah. Ord. XII of 2011), published under the authority of the Governor ].

---

**URBAN DEVELOPMENT DEPARTMENT**
Mantralaya, Mumbai 400 032, dated the 21st May 2011.

**MAHARASHTRA ORDINANCE No. XII OF 2011.**

*AN ORDINANCE*

*further to amend the Mumbai Municipal Corporation Act, the Bombay Provincial Municipal Corporations Act, 1949 and the City of Nagpur Corporation Act, 1948.*

WHEREAS both Houses of the State Legislature are not in session;

AND WHEREAS the Governor of Maharashtra is satisfied that circumstances exist which render it necessary for him to take immediate action further to amend the Mumbai Municipal Corporation Act, the Bombay Provincial Municipal Corporations Act, 1949 and the City of Nagpur Corporation Act, 1948, for the purposes hereinafter appearing;

Bom. III of 1888. Bom. LIX of 1949. C.P. and Berar II of 1950.

NOW, THEREFORE, in exercise of the powers conferred by clause (1) of article 213 of the Constitution of India, the Governor of Maharashtra is hereby pleased to promulgate the following Ordinance, namely :—

## CHAPTER I

### PRELIMINARY.

Short title and commencement.

1. *(1)* This Ordinance may be called the Maharashtra Municipal Corporations (Second Amendment) Ordinance, 2011.

*(2)* It shall come into force at once.

## CHAPTER II

### AMENDMENTS TO THE MUMBAI MUNICIPAL CORPORATION ACT

Amendment of section 16 of Bom. III of 1888.

2. In section 16 of the Mumbai Municipal Corporation Act (hereinafter, in this Chapter, referred to as " the Mumbai Corporation Act"), after sub-section *(1)*, the following sub-section shall be inserted, namely :— Bom. III of 1888.

"*(1-1A)* If, a Councillor or a person is found to be guilty of misconduct in the discharge of his official duties, or of any disgraceful conduct while holding or while he was holding the office of the Mayor or, as the case may be, the Deputy Mayor, the State Government may, after giving such Councillor or person a reasonable opportunity of being heard,—

*(a)* disqualify such Councillor to continue as a Councillor for the remainder of his term of office as a Councillor ; and also for being elected as a Councillor for a period of six years from the date of order of such disqualification ;

*(b)* disqualify such person for being elected as a Councillor for a period of six years from the date of order of such disqualification. ".

Amendment of section 18 of Bom. III of 1888.

3. In section 18 of the Mumbai Corporation Act,—

*(a)* for the portion beginning with the words "the Commissioner" and ending with the words " shall be a conclusive.", the following shall be substituted, namely :—

"the Commissioner, at the request of the corporation or otherwise, shall refer to the Government ; and the Government, after making such inquiry as it deems necessary, shall determine whether or not such Councillor has become disqualified for being a Councillor, and its decision shall be conclusive :

Provided that, no Councillor shall be disqualified by the Government under this section, unless he has been given a reasonable opportunity of being heard.";

*(b)* in the marginal note, for the words " Chief Judge of the Small Cause Court " the word " Government " shall be substituted.

4. Section 36 of the Mumbai Corporation Act shall be re-numbered as sub-section *(1)* thereof ; and,— Amendment of section 36 of Bom. III of 1888.

*(a)* in sub-section *(1)*, as so re-numbered, for clause *(t)*, the following clause shall be substituted, namely :—

"*(t)* the Commissioner or where the Commissioner is unable to attend owing to absence or illness or for any other reasonable cause, an officer not below the rank of the Deputy Commissioner, shall have the same right of being present at a meeting of the corporation and of taking part in the discussions thereat as a Councillor, and with the permission of the Mayor, may at any time make a statement or explanation of facts, but he shall not be at liberty to vote upon or to make any proposition at such meeting. Where the Commissioner, or any such officer desires to make a statement or explanation of facts at a meeting and the permission as aforesaid is not given, the Commissioner or any such officer shall be entitled to lay a copy thereof on the Table of the House. But when required by the corporation or the Mayor, the Commissioner shall himself attend the meeting of the corporation, unless he is prevented from doing so on account of absence, illness or any other reasonable cause;";

*(b)* after sub-section *(1)*, as so re-numbered, the following sub-section shall be added, namely :—

"*(2)* Where, any proposal of the Commissioner requires sanction or approval of the corporation, the corporation shall consider and dispose of any such proposal within ninety days reckoned from the date of the meeting of the corporation held immediately after the proposal is received by the Municipal Secretary, whether the item pertaining to such proposal is taken on the agenda of such meeting or not, failing which the sanction or approval to such proposal shall be deemed to have been given by the corporation, and a report to that effect shall be made by the Commissioner to the Government and he shall take further action as per the directives of the Government :

Provided that, any such deemed sanction or approval shall be restricted to the extent the proposal conforms to the provisions of this Act or any other law for the time being in force.".

5. In section 37 of the Mumbai Corporation Act, after sub-section *(7)*, the following sub-section shall be added, namely :— Amendment of section 37 of Bom. III of 1888.

"*(8)* The Mayor or the Deputy Mayor may be removed from the office by the State Government, if he fails to convene two consecutive meetings of the corporation as specified by or under this Act, and the Mayor or Deputy Mayor so removed shall not be eligible for re-election or re-appointment as Mayor or, as the case may be, Deputy Mayor during the remainder term of his office :

Provided that, no such Mayor or Deputy Mayor shall be removed from office, unless he has been given a reasonable opportunity to furnish an explanation :

Provided further that, removal of the Mayor or Deputy Mayor from the office under this sub-section shall not affect his continuance as a Councillor for the remainder term of his office.".

Amendment of section 50A of Bom. III of 1888.

**6.** In section 50A of the Mumbai Corporation Act, in sub-section *(2)*, for the portion beginning with the words " the Commissioner shall " and ending with the words " his decision shall be final ", the following shall be substituted, namely :—

" the Commissioner, at the request of the corporation or otherwise, shall refer to the Government; and the Government, after making such inquiry as it deems necessary shall determine whether a vacancy has occurred, and its decision shall be final :

Provided that, no decision regarding the vacancy under this section shall be taken by the Government unless such member has been given a reasonable opportunity of being heard.".

Insertion of sections 53A and 53B in Bom. III of 1888.

**7.** After section 53 of the Mumbai Corporation Act, the following sections shall be inserted, namely :—

Exercise of powers and discharge of duties of any committee by corporation.

" **53A.** If, any committee or special committee under this Act is not constituted at any point of time, or for any reason not in a position to exercise its powers or discharge its duties under this Act, its powers shall be exercised and its duties shall be discharged by the corporation until such committee is constituted or in a position to exercise its powers or discharge its duties.

Removal of Chairman or Deputy Chairman of committees.

**53B.** The Chairman or the Deputy Chairman, if any, of any committee constituted under this Act may be removed from the office by the Government, if he fails to convene two consecutive meetings of the committee as specified by or under this Act, and the Chairman or Deputy Chairman so removed shall not be eligible for re-election or re-appointment as Chairman or, as the case may be, Deputy Chairman of such committee during the remainder term of his office :

Provided that, no such Chairman or Deputy Chairman shall be removed from office, unless he has been given a reasonable opportunity to furnish an explanation :

Provided further that, removal of the Chairman or Deputy Chairman from the office under this section shall not affect his continuance as a Councillor for the remainder term of his office.".

Amendment of section 60A of Bom. III of 1888.

**8.** In section 60A of the Mumbai Corporation Act, sub-section *(3)* shall be deleted.

Amendment of section 60D of Bom. III of 1888.

**9.** In section 60D of the Mumbai Corporation Act, sub-section *(2)* shall be deleted.

Amendment of section 64 of Bom. III of 1888.

**10.** In section 64 of the Mumbai Corporation Act, after sub-section *(3)*, the following sub-section shall be inserted, namely :—

"*(3A)* Where, any proposal of the Commissioner requires sanction or approval of any committee constituted under the provisions of this Act, the committee shall consider and dispose of any such proposal within forty-five days reckoned from the date of the meeting of the committee held immediately after the proposal is received by the Municipal Secretary, whether the item pertaining to such proposal is

taken on the agenda of such meeting or not, failing which the sanction or approval to such proposal shall be deemed to have been given by such committee and a report to that effect shall be made by the Commissioner to the corporation :

Provided that, any such deemed sanction or approval shall be restricted to the extent the proposal conforms to the provisions of this Act or any other law for the time being in force.".

Amendment of section 69 of Bom. III of 1888.

**11.** In section 69 of the Mumbai Corporation Act, in clause *( c )*,—

*(a)* for the words " ten lakhs but not exceeding rupees fifteen lakhs " the words "one crore but not exceeding rupees one crore and fifty lakhs" shall be substituted;

*(b)* for the words "excess of fifteen lakh rupees" the words "excess of one crore and fifty lakhs rupees" shall be substituted;

*(c)* before the existing first proviso, the following proviso shall be inserted, namely :—

"Provided that, every contract made by the Commissioner involving an expenditure exceeding five lakhs rupees and not exceeding one crore and fifty lakhs rupees shall be reported by him within fifteen days after the same has been made, to the Standing Committee:";

*(d)* in the existing first proviso,—

*(i )* for the words " Provided that " the words " Provided further that " shall be substituted;

*(ii)* for the words "one crore rupees" the words "fifteen crore rupees" shall be substituted;

*(e)* in the existing second proviso,—

*(i)* for the words "Provided further that" the words and figures "Provided also that, notwithstanding anything contained in section 64, " shall be substituted ;

*(ii)* the following *Explanation* shall be added, namely :—

"*Explanation*.—For the purposes of this clause, the period of "thirty days from the receipt" shall be reckoned from the date of the meeting of the standing committee held immediately after the proposal is received in the office of the Municipal Secretary whether the item pertaining to such proposal is taken on the agenda of such meeting or not.".

Amendment of section 70 of Bom. III of 1888.

**12.** In section 70 of the Mumbai Corporation Act, in sub-section *(2)*,—

*(a)* for the words " two members of the standing committee " the words "any two persons from amongst any two members of the standing committee, Municipal Secretary and any officer, not below the rank of Deputy Municipal Commissioner, as may be authorised by the Commissioner" shall be substituted;

*(b)* for the words " the said two members of the standing committee " the words " the said two persons " shall be substituted;

*(c)* for the words " the said members " the words " the said two persons " shall be substituted;

*(d)* in the proviso, the words " in lieu of two members of the standing committee " shall be deleted.

Amendment of section 72 of Bom. III of 1888.

13. In section 72 of the Mumbai Corporation Act—

(*1*) in sub-section *(1)*,—

*(a)* for the words "fifty thousand rupees" the words "three lakhs rupees" shall be substituted ;

*(b)* the following proviso shall be added, namely :—

"Provided that, the notice of any tender for contract not exceeding the amount of three lakhs rupees shall be uploaded on the official website of the corporation.";

*(2)* in the marginal note, for the letters and figures "Rs. 50,000" the words " three lakhs rupees" shall be substituted.

Insertion of section 106A in Bom. III of 1888.

**14.** After section 106 of the Mumbai Corporation Act, the following section shall be inserted, namely :—

Restrictions on utilisation of funds created by corporation.

" **106A.** Notwithstanding anything contained in section 106, except with the prior approval of the State Government, neither any internal loan shall be taken by the corporation from any of the funds created by the corporation nor shall any utilisation of such funds for any purposes other than the purposes for which the funds are created be made by the corporation .".

Amendment of section 122 of Bom. III of 1888.

**15.** In section 122 of the Mumbai Corporation Act, in sub-section *(1)*, after the words "public securities" the words "or in bonds or debentures of the Central Government, State Government, Government Undertakings, Government Financial Institutions or Unit Trust of India" shall be added.

Insertion of section 129A in Bom. III of 1888.

**16.** After section 129 of the Mumbai Corporation Act, the following section shall be inserted, namely :—

Estimates of expenditure and income deemed to be budget estimates.

"**129A.** Notwithstanding anything contained in this Act, if for any reason the corporation has not finally adopted the budget estimates before the commencement of the official year to which they relate, the statement of expenditure and income prepared by the Commissioner under section 125 shall be deemed to be the budget estimates for the year until the corporation duly adopts the budget estimates as per the provisions of this Act.".

Amendment of section 520B of Bom. III of 1888.

**17.** In section 520B of the Mumbai Corporation Act, in sub-section *(1)*, after the words "against the interests of the public" the words "or is likely to be against the financial interests of the corporation or against the larger public interest" shall be inserted.

## CHAPTER III

### AMENDMENTS TO THE BOMBAY PROVINCIAL MUNICIPAL CORPORATIONS ACT, 1949

Bom. LIX of 1949.

Amendment of section 10 of Bom. LIX of 1949.

**18.** In section 10 of the Bombay Provincial Municipal Corporations Act, 1949 (hereinafter, in this Chapter, referred to as "the Provincial Corporations Act"), after sub-section *(1)*, the following sub-section shall be inserted, namely :—

"*(1-1A)* If, a Councillor or a person is found to be guilty of misconduct in the discharge of his official duties, or of any disgraceful conduct while holding or while he was holding the office of the Mayor or, as the case may be, the Deputy Mayor, the State Government may, after giving such Councillor or person a reasonable opportunity of being heard,—

*(a)* disqualify such Councillor to continue as a Councillor for the remainder of his term of office as a Councillor ; and also for being elected as a Councillor for a period of six years from the date of order of such disqualification ;

*(b)* disqualify such person for being elected as a Councillor for a period of six years from the date of order of such disqualification.".

Amendment of section 12 of Bom. LIX of 1949.

**19.** In section 12 of the Provincial Corporations Act,—

*(a)* in sub-section *(1)*,—

*(i)* after the words "at the request of the Corporation" the words "or otherwise" shall be inserted ;

*(ii)* for the word "Judge" the word "Government" shall be substituted;

*(b)* in sub-section *(2)*, for the word "Judge", at both the places where it occurs, the word "Government" shall be substituted;

*(c)* in the marginal note, for the word "Judge" the word "Government" shall be substituted.

Amendment of section 13 of Bom. LIX of 1949.

**20.** In section 13 of the Provincial Corporations Act,—

*(a)* in sub-section *(2)*, the proviso shall be deleted;

*(b)* sub-section *(4)* shall be deleted.

Amendment of section 19 of Bom. LIX of 1949.

**21.** In section 19 of the Provincial Corporations Act, after sub-section *(5)*, the following sub-section shall be added, namely :—

"*(6)* The Mayor or the Deputy Mayor may be removed from the office by the State Government, if he fails to convene two consecutive meetings of the Corporation as specified by or under this Act, and the Mayor or Deputy Mayor so removed shall not be eligible for re-election or re-appointment as Mayor or, as the case may be, Deputy Mayor during the remainder term of his office:

Provided that, no such Mayor or Deputy Mayor shall be removed from office, unless he has been given a reasonable opportunity to furnish an explanation :

Provided further that, the removal of Mayor or Deputy Mayor from the office under this sub-section shall not affect his continuance as a Councillor for the remainder term of his office.".

Amendment of section 26 of Bom. LIX of 1949.

**22.** In section 26 of the Provincial Corporations Act, in sub-section *(2)*,—

*(a)* after the words "at the request of the Corporation" the words " or otherwise" shall be inserted;

*(b)* for the word "Judge" the word " Government" shall be substituted.

Insertion of sections 35A and 35B in Bom. LIX of 1949.

**23.** After section 35 of the Provincial Corporations Act, the following sections shall be inserted, namely :—

Exercise of powers and discharge of duties of any committee by corporation.

"**35A.** If, any committee or special committee under this Act is not constituted at any point of time, or for any reason not in a position to exercise its powers or discharge its duties under this Act, its powers shall be exercised and its duties shall be discharged by the Corporation until such committee is constituted or in a position to exercise its powers or discharge its duties.

Removal of Chairman and Deputy Chairman of committees.

**35B**. The Chairman or the Deputy Chairman, if any, of any committee constituted under this Act may be removed from the office by the Government, if he fails to convene two consecutive meetings of the corporation as specified by or under this Act, and the Chiarman or Deputy Chairman so removed shall not be eligible for re-election or re-appointment as Chairman or, as the case may be, Deputy Chairman of such committee during the remainder term of his office :

Provided that, no such Chairman or Deputy Chairman shall be removed from office, unless he has been given a reasonable opportunity to furnish an explanation :

Provided further that, removal of the Chairman or Deputy Chairman from the office under the provisions of this section shall not affect his continuance as a Councillor for the remainder term of his office.".

Insertion of section 39A in Bom. LIX of 1949.

**24.** After section 39 of the Provincial Corporations Act, the following section shall be inserted, namely :—

Appointment of Additional Municipal Commissioners.

"**39A.** *(1)* The State Government may create one or more posts of Additional Municipal Commissioners in the Corporation and appoint suitable persons on such posts, who shall, subject to the control of the Commissioner, exercise all or any of the powers and perform all or any of the duties and functions of the Commissioner.

*(2)* Every person so appointed as the Additional Municipal Commissioner shall be subject to the same liabilities, restrictions and terms and conditions of service, to which the Commissioner is subjected to as per the provisions of this Act.".

